# लोकहितवादी

## सरदार गोपाळराव हरी देशमूख.


लेखक

**प्रो० गणेश हरी केळकर, एम्. ए.**

इंग्रजी व मराठी भाषांचे अध्यापक—फर्ग्युसन कॉलेज,

लाईफ मेंबर, डेक्कन ए सोसायटी, पुणें.





प्रथमावृत्ती–१९२[illegible]

किंमत १२ आणे.

## प्रस्तावनेचे चार शब्द.

'लोकहितवादी' सरदार गोपाळराव हरी देशमूख यांचा जन्म होऊन चालू साली शभर वर्षे झाली. या शतसांवत्सरिकाच्या निमित्तानें येथील डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीने त्याचे ग्रथ व कार्य याविषयी चर्चात्मक निबध मागविले होते. त्या जाहिरातीला अनुलक्षून व तीत आखून दिलेल्या मर्यादेनुसार हा निबध लिहिला व तो सोसायटीनें पसत केला.

हा निबंध म्हणजे अर्थातच चरित्र नव्हे. तत्कालीन सामाजीक परिस्थिती, लोकहितवादीची मतें, त्याचा त्या परिस्थितीशी सबध वगैरे गोष्टीची चर्चाच यात विशेषतः सापडेल. चरित्राचीही माहिती थोडी फार दिली आहे, व तीही चारित्र्याचा बोध व्हावा या हेतूने दिली आहे. ती जेथून मिळाली त्या त्या प्रमाणे निर्देश पुस्तकात केला आहे. रा० रा० आठल्ये यानी लिहिलेल्या अप्रकाशित चरित्रातून घेतलेल्या गोष्टीचा उपयोग करण्याची परवानगी लोकहितवादीचे चिरजीव डॉ० नानासाहेब यांनी दिली, निबधाची आखलेली रूपरेखा पाहून तिच्या सबधाने उपयुक्त सूचना दुसरे चिरजीव रा० आप्पासाहेब देशमूख यानी केल्या, लोकहितवादीच्या मृत्यूनतर प्रसिद्ध झालेले वर्तमानपत्रांतील लेख व इतर बरीच उपयोगी कागदपत्रे माझे मित्र रा० शरश्चद्र वामन रानडे यानी दिली; याशिवाय बारीकसारीक मदत पुष्कळाचीच झाली आहे त्या सर्वाचा मी अत्यत उतराई आहे. हें निबध लिहून काढण्याच्या मेहनतीचें बरेचसे काम माझे मित्र रा० द. ल. गोखले व रा० ग. वि. साने यानी केले व त्यामुळेंच वेळेवर निबध तयार झाला.

त्याचप्रमाणें सोसायटीने निबध छापण्याची परवानगी दिल्यान
१५।२० दिवसाच्या अल्पावधीत मुद्रण व प्रकाशन या गोष्टी
जोखीम रा० अनतराव गोखले व रा० माधव रामचंद्र जोशी, बी.
या मित्रांनी अगावर घेतली. या सर्वांचे मी आभार मानितों.

निबधाचें मूळ स्वरूप होईल तितके कायम ठेवून, सोसायटीच्या परीक्षकांनी केलेल्या सूचनाचा उपयोग दुरुस्ती करतांना केला आहे अल्पावकाशात पुस्तक तयार करावयाचे असल्यामुळे उणेपणा पुष्कळ राहिला असण्याचा सभव आहे. तरी पण फार वर्षे मागे पडलेला विषय लोकापुढें आला व जन्मतिथीला नाही, तरी या वर्षात पुस्तक प्रसिद्ध झाले हीच समाधानाची गोष्ट आहे.

पुणें, फरग्युसन कॉलेज,
२५ जुलै १९२३.

**गणेश हरी केळकर.**

# लोकहितवादी

' लोकहितवादी ' या टोपण नावानें गेल्या दोन तीन पिढ्यांना
रिचीत असलेले लेखक व ग्रंथकार कै० सरदार गोपाळराव हरी
शमूख याचा जन्म झाल्याला यदा शंभर वर्षे झाली एखाद्या
व्यक्तीच्या इतिहासात एवढा काळ बराच मोठा असें म्हणता येईल;
ण राष्ट्राची गोष्ट तशी नाहीं विशेषत हिंदुस्थान देशासारख्या
राष्ट्रसमूहाच्या इतिहासात हा काळ म्हणजे एक अगदी लहानसा अंश
सेच म्हणणे जास्त खरें आहे,पण या विशिष्ट शंभर वर्षांत हिंदुस्थानच्या
ाच्या आचारविचारात घडून आलेली क्रांती इतकी विलक्षण आहे
ाया काळाचे यथार्थ वर्णन करावयाचे असेल तर ते मन्वंतर किंवा
तर अशासारख्या शब्दानीच करावे लागेल या दृष्टीने या गतकालाचें
ीक्षण करू लागलें असता मनात अनेक विचारतरंग उभे राहू-
न, व घडून आलेल्या फरकाबद्दल किंचित् विस्मय, व भावी परि-
माबद्दल केव्हा निराशा, तर बहुधा आशा, अशा अनेक भावनानी
भरून येते या बदललेल्या परिस्थितीचें सामान्य स्वरूप
देशभर एकसारखेच असल्यामुळें तिचा विचार या व्यापक
ीनें पण प्रस्तुत लेखाच्या मर्यादेकरिता महाराष्ट्रापुरते विशेष लक्ष
, करणें योग्य होईल. तो तसा करून मग लोकहितवादी याचें
ा, चारित्र्य वगैरे गोष्टीकडे क्रमाक्रमाने वळतों.

इंग्रजी राजसत्तेचा पाया हिंदुस्थानात अठराव्या शतकाच्या
खेरीस भक्कम बसला असें म्हणता येईल. बंगाल, मद्रास, व दिल्ली
प्रांतात ती सत्ता याच्या अगोदरच प्रस्थापीत झाली होती.

दक्षिणेंत मराठे व हैदरटिप्पू यांनी कांही वर्षे टिकाव धरिला. पण अखेरीस टिपूसाहेबाचा गैरमुत्सद्दीपणा व मराठे सरदाराचे आपापसांतील कलह या व अशा इतर कारणांनी या दोन राज्यांस उतरती कळा लागली. म्हैसूरचा सर्वच कारभार सन १७९९ साली आटपला व त्याच सुमारास, सवाईमाधवराव, नाना, महादजी, फडके परशरामपंत पटवर्धन इत्यादि कर्त्या पुरुषाचे एकामागून एक घडून आलेले मृत्यू, रावबाजीचे राज्यारोहण, पुण्याची लूट, व वसईचा तह इत्यादि ज्या अनेक घडामोडी मराठेशाहीत लागोपाठ घडू आल्या त्यामुळें ते राज्यही त्याच वेळी नामशेष झाले असें म्हटले तरी चालेल. एकीकडे मराठे मुत्सद्दी व वीर 'आता राज्याचा निभाव कसा लागतो' या काळजीनें दिवसेंदिवस खगत चालले होते, तर दुसरीकडे इग्रजी मुत्सद्यांचा आत्मविश्वास, अभिमान, हिंमत ही वाढत होती. या विधानाचे प्रत्यतर पहावयाचें असल्यास सरदार बापू गोखले यांच्या चरित्रांत एका प्रसगीं तें पहावयास सांपडते. वसईच्या तहानतर पेशव्याचे सेनापती बापू व इग्रजी सेनापती आर्थर वेलस्ली यांनी मिळून पुण्याच्या आसपासचा बडावा मोडला. दोन्ही फौजा आपापल्या घरी परत निघते वेळीं बापूच्या कामगिरीबद्दल एक "शिफारसपत्र" त्यास वेलस्ली साहेबांनी दिलें. त्यांत खाली मजकूर सांपडतो:—

"Bapoojee Ganesh Gokhaley joined me with the bc of Mahratta Troops under his command in the month of M 1803 His troops were engaged with the enemy repeat and always conducted themselves well, and Gokhaley par lary distinguished himself and then in a late action aga a formidable band of free booters, who had assembled the frontiers of the Peshawa's territories, and cut off supplies of the city of Poona. *I have given him this p*

*in testimony of my uniform approbation of his conduct* and that of his troops I request that any British officers and others to whom this paper may at any time be shown will consider Bapoojee Ganesh Gokhaley as the friend of the British Government.

( Sd ) AURTHUR WELLESLY

*Poona, 6th March 1804*

या शिफारसवजा चिटोऱ्याचा अर्थ इतका स्पष्ट आहे की, त्याच्यावर टीका करण्याची जरूर नाही हें पत्र देणाऱ्या वेल्स्ली साहेबाच्या धाडसाची जास्त तारीफ करावी, की बापूच्या आत्मवचनेबद्दल रडावें हें ठरविणें कठीण आहे

या अखेरअखेरीच्या दिवसात पेशवाईची स्थिती अत्यत हलाखीची होती. खुद्द बाजीरावाचा विचार बघितला तर नशिबानें व नवसअनुष्ठानानी मिळालेलें राज्य चार दिवस भोगावे एवढीच त्याची इतिकर्तव्यता असावी असे वाटते. वाड्यात किंवा पर्वतीला कधी भटाभिक्षुकाचे तांडे जमवावेत, त्यांना सव्वा हात लाब केळीच्या पानावर भोजनें घालावीत, अन्नसतर्पण करावे, दक्षिणा द्यावी, पण याहीपेक्षा, गावातल्या उडग्या बायकाचे थवे जमावावेत व त्याच्या सगतीत कालक्रमणा करावी, यांतच त्यांचा विशेष वेळ जात असे.

लोकहितवादी यानी ऐतिहासिक गोष्टी या पुस्तकाच्या पहिल्या भागात शेवटच्या बाजीरावाची दिनचर्या दिली आहे, त्यातील जरूरीपुरता उतारा येथें देतो.

'बाजीराव याची, बुधवार वाडा, शुक्रवार वाडा, फुलशहर म्हणजे फुलगांव वगैरे स्थलें प्रसिद्ध आहेत. फुलशहर हा तर पुण्याचा मकरपुराच होता. शिवाय कोथरूडचा वाडा, पाषाणचा वाडा, व पर्वती अशी पाच सहा ठिकाणें होती. वाड्यात दोनतीनशें बायका नित्य न्हावयास

येत असत. त्यांनी सकाळी न्हावयाचा समारंभ करावा, तो प्रहर दिवसपर्यंत चाले! नतर जेवावयाची तयारी झाल्यावर इच्छेस येईल त्या वाड्यांत बाजीरावांची स्वारी जात असे. पक्तिभोजनाचे समयीं सर्वकाळ बायका जवळ बसलेल्या असावयाच्या. आश्रीत लोकांनी चार चार पाच पांच लग्नें करून घरी एक बायको ठेवावी, आणि सरकार वाड्यांत बाकीच्या बायका पाठवाव्या! आणि याजकरितां अन्याबा राहतेकर वगैरे यांनी जास्ती लग्नें केली होती? जो गृहस्थ वाड्यांत बायको पाठविणार नाही त्याजवर श्रीमतांची इतराजी व्हावयाची, याजमुळें अब्रूदार गृहस्थांनी वाड्यात जाण्याचें सोडिलें, इतकेंच नाही, तर पुणें देखील सोडिलें. सर्व अब्रूदार तितके या कृत्यास नाराजी होते, आणि गैरअब्रुदार तितके या कृत्यात सामील होते. बायकांनी सर्व कारभार करावा, व उलटा नवऱ्यावरच त्याचा हुकूम असे! त्यांनी आपल्या नवऱ्यांकरितां श्रीमतास सांगून त्यांस मामलती,कमाविशी, वगैरे द्याव्या!! त्यांजवर नवऱ्यांचा हुकूम इतकाच की, वाड्यांत राहा आणि सरकारची मर्जी खूष करा! बयाताई दातारीण, शिता शेंडी, काशी दिक्षितीण, उमा फडकीण, ताई पेठीण या प्रकारच्या सुमारें दोनचारशें उनाड बायकांचा थवा नेहमी वाडयात भरलेला असे. तितक्यांचे शृगार, दागिने आणि सोगट्या वगैरे गोंधळ चालून त्यांत श्रीमतानी काळ काढावा! शिष्ये, पाणके वगैरेशी व्याभिचाराची त्यास सदर परवानगी असे! त्यात कितीएक स्त्रिया बहूत देखण्या, रूपवान, ज्वान, थट्टेखोर व बोलक्या असत. त्याप्रमाणें रावबाजीच्या कारकीर्दात सर्व गृहस्थांचीं घरें खराब झाली! जेवून उठले म्हणजे पर्वतीस वगैरे दर्शनास आल्यावर शास्त्री, पडीत व भट यांची कचेरी होत असे. त्यांपैकीं कोणी म्हणावें 'बाजी हा कृष्णावतार आहे!' कोणी म्हणावें,

'शिवाचा अवतार प्रगटला आहे !' वर्षातून सहा महिने याखाली जावयाचे. कोपरगाव ही पूर्वी बाजीच्या कैदेची जागा होती, तेथें व पढरपूर,नाशीक इतके ठिकाणी बाजीरावाची स्वारी वर्षास जावयाची.

ह्याप्रमाणें ह्यांत सहा महिन्यांचा काळ जात असे. एकदर राज्य-कारभाराच्या नावानें शून्य ! फार तर काय ? पण दौतलेखणीही वाडयांत मिळावयाची नाही ! ज्याला काम असेल त्याला भेट व्हावयाची नाही ! बायकांचे हातून सर्व कारभार चालावयाचा. सदाशीव माणकेश्वर व चिंतो वामन देशमूख याचे घरी जाऊन मक्तयानें मामलती वगैरे घ्याव्या. त्यांत सरकारास पैसा मात्र पुष्कळ भरावा लागे. सर्व खर्चात जेवणाचा खर्च काय तो मोठा. ब्राह्मणास सतुष्ट करण्याकरिता मोठाली दानें देत. फौजफाटा, पागा, हुजुरात, सरदार, मुत्सद्दी वगैरे यास पैसा मिळावयाचा नाही, याप्रमाणें स्थिती होती ! सर्व सरदाराशी द्वेष असे. कारण की, ते नाना फडणविसाचे कारकीर्दीतील व सवाई माधवरावाचे पक्षांतील होते.'

धन्याचे लक्ष याप्रमाणें कारभारांत नसल्यामुळें जुने व नेकीचे नाना, परशरामभाऊ पटवर्धन यासारखे सरदार देखील वैतागले होते. नवीन माणसें हाताशी धरावीत, त्याना राजकारण शिकवावे, त्यांच्या करामतीचा उपयोग करून घ्यावा ही बुद्धी कोणांतही नव्हती. त्यामुळें नवीन महत्त्वाकांक्षी माणसांचा ओढा बाहेर होता. बाळाजीपत नातूंचेंच उदाहरण घ्या. ते इग्रजाना भाळले, त्याबद्दल सामान्य माणूस त्यांना दोष देतो, व तें साहजीक आहे. पण आमच्या आजच्या देशाभिमानाच्या कल्पना व त्या वेळच्या कल्पना यांत पुष्कळच फरक आहे; आणि शिवाय फडके, पेठे, भानू ही गरीब घराणी आपल्या कर्तृत्त्वानें पूर्वपेशवाईत पुढें आली, तसें नातूंचें घराणें उत्तर पेशवाईत पेशव्यांच्या कृपेनें पुढें येण्याला वाव असता तर बाळाजीपंतासारख्या धोरणी माणसांनी

स्वार्थ आणि परार्थ ही दोन्ही एकत्र साधत असतांना शुद्ध बेइमानगिरीच केली असती, असे तरी कोणास म्हणता येईल ! सांगण्याचें तात्पर्य काय की, धन्याच्या बेहिंमतीमुळें नोकर व सरदार बेदील झाले होते. आजूबाजूला इंग्रजाचा अमल बसून नाकेबंदी झाली व मुलूखगिरी करण्याचा पिढीजाद मराठी धंदा बुडाला त्यामुळें बेकार झालेले शिपाई खेडोखेडी माशा मारीत पडले होते यांपैकी थोडीशी माणसें या आळसाला कंटाळून पुष्कळ वेळा वाट मारण्याचाही धंदा करीत किंवा आपापसांत, गावागावांत मारामाऱ्या करून आपली भांडणाची हौस पूर्ण करून घेत असत पूर्वी ज्यांनी शत्रूशी लढण्याकरितां उत्तरेंत अटके-पर्यंत आणि दक्षिणेंत श्रीरंगपट्टणापर्यंत स्वाऱ्या करून कडव्या शत्रूंना धूळ चारली त्यांचे वंशज या बदललेल्या दिवसांत बापजाद्यांनी मिळवलेल्या संपत्तीवर गांवोगांवी लावण्यातमाशांचे फड काढून रंग करीत. किंवा क्वचित् प्रसंगी बाहेरख्यालीपणा करून घरच्या घर-धानेणीशी भांडत दिवस काढीत अशा तऱ्हेनें विस्कळित झालेल्या समाजस्थितीचें चित्र परशराम, होनाजी इत्यादि तत्कालीन शाहिरांच्या लावण्यापोवाड्यांतून रंगलेलें आहे. सामान्य रयतेची दुर्दशा ही इतकी उघड उघड दिसते. तिचें जास्त वर्णन करून जागा अडवीत नाही

या बेबंदशाहीच्या कारभारांत हात घालण्याची संधी अलिफ्स्टन-सारख्या धोरणी मुत्सद्यास केव्हांही मिळालीच असती पण गंगाधर-शास्त्री पटवर्धनाचा* पंढरपुरास पेशव्यांनी करविलेला खून, व त्या-नंतर डेंगळ्यांची फितुरी, यानें आयतेंच कारण मिळालें व गोष्टी

* या गोष्टीविषयीं हल्लीं दुमत आहे असें दिसतें पण पेशवे पंढरपुरीं हजर असतांना त्यांच्या देखत देखत ज्या परिस्थितींत हा खून झाला ती परिस्थिती लक्षांत घेतली म्हणजे हा खून पेशव्यांनी करविला नाही असे म्हणावयाला जास्त पुरावा पाहिजे

निकरावर आल्या. खडकीला एकादी लहानशी चकमक झाली, आणि सङ्कट आले आले असे म्हणणार तोपर्यंत बाजीराव पळालेसुद्धा. खुद्द राजधानीच्या शहरात, जेथें श्रीमताचे दर्शन रोज हजारों लोकांस घडत असे, व नोकरी, ऋणानुबध इत्यादी अनेक कारणांनी श्रीमताच्या लाग्याबांध्याची माणसे शेकडो होती, तेथे अकस्मात् घडलेल्या या प्रकाराने पुष्कळाना वाईट वाटले असेल, व आश्चर्य तर सर्वानाच वाटले असेल हे खरे, पण मार्मीक रीतीनें पाहणाराला तेव्हांही, झाले हे केवळ अगदीच अनपेक्षीत किंवा केवळ गैरच झालें असे वाटले नाहीं. त्यातूनही अल्पिष्टन साहेबानी धोरण राखून शत्रुपक्षाच्या लोकांना सभाळून घेतलें, त्याची समजूत घातली व त्याचे नेहमीचे व्यवहार अव्याहतपणे चालू राहतील असे आश्वासन दिले या गोष्टीमुळे तर इग्रजी राज्याचा परकेपणा दिवसानुदिवस कमी होत चालला. रावबाजीनी पुण्यातून कायमचा पाय् काढल्यावर अल्पिष्टन साहेबानी एक जाहीरनामा काढला या जाहीरनाम्यात वसईच्या तहानतर रावबाजीनी इग्रजाविरुद्ध केलेल्या कारस्थानाचा उल्लेख करून व पेशव्याविरुद्ध इग्रजांस शस्त्र का उचलावें लागले हे सागून पुढील राज्यव्यवस्थेचें धोरण कसे राहील यासबधानें लिहितांना ते म्हणतात—

"कपनी सरकारात मुलूख राहिले तेथें कपनी सरकारचा अम्मल होईल, परतु कोणाचे वतनास व इनामास व वर्षासनास व देवस्थानचे खर्चीस व खैरातीस व कोणाचे ज्ञातीचे धर्मास खलेल न होता वाजवी असेल तसें सुरळीत चालेल व बाजीराव साहेब मक्तेदारास मामलती देत होते ते तहकूब होऊन कमावीसदार यांजकडे मामलती सागून जो वाजवी ऐवज असेल त्याची उगवणी होईल. कोणावर जुलूम जास्ती कांही एक होणार

नाही, येविशी कोणीही अदेशा घेऊ नये. बाजीराव साहेब याजकडे जे चाकरीस असतील त्याणी चाकरी सोडून आजपासून दोन महिन्यात आपले घरी यावे, जे कोणी न येतील त्याची वतने जप्त होऊन खराबी झाल्याशिवाय राहणार नाही. जमीनदार याणी आपापले परगण्यातील जे कोणी बाजीराव साहेब याजकडे चाकरीस असतील त्याची याद नावानिशीवार तूर्त समजावी चाकरी सोडून जसजसे घरी येतील ते वेळेस समजावीत जावे बाजीरावसाहेब याची कुमक करू नये, व त्यांजकडे वसूल एकदर देऊ नये. न दिल्यास साल-मजकुरी मुलखास उपद्रव लागला आहे त्याची दर्याप्ती होऊन सूट मिळेल, बाजीरावसाहेब याजकडे वसूल दिल्यास तो ऐवज मजुरा न देतां दरोबस्त ऐवज घेतला जाईल व जमीनदार कुमक करतील व ऐवज न देतील तर त्याची वतने व जमीनो त्याजकडे चालणार नाहीत. व लष्करकडे व हरएक जे कोणी मुलूख लुटतील व वाटा मारितील ते जिवानिशी गेल्याखेरीज राहणार नाहीत.''

ता. ११ माहे फेब्रुवारी सन १८१८ इसवी

**बमाजी बेहुकूम एलफिनस्टन साहेब बहादूर.**

याप्रमाणे राज्यांतर घडून आले देशमूख घराण्याला हे अरिष्ट चांगलेच भोवले, कारण या घराण्यातील त्या वेळचे कर्ते पुरुष चिंतो ब्रामन देशमूख हे पेशव्याचे मुख्य मसलतगार होते. "राज्यांतर होणे हे मोठें अनिष्टाचे कारण आहे" असे लोकहितवादी यानी एका ऐतिहासिक टिपणात म्हटले आहे, आणि त्याचे उदाहरण म्हणून बाजीराव पुण्यातून गेल्यानंतर झालेल्या दुःस्थितीचे वर्णन केलें आहे. त्यांत ते म्हणतात—" त्या वेळेस कितीएक लोक भाऊ दातार, बापूजी नाईक, पिदडी व बापू कृपाराम पराजपे वगैरे हजारो सावकार,

सरदार, कारकून, शिलेदार, कारखानेवाले, गृहस्थ, पालखीत बसून फिरणारे, त्यास पायात घालावयास जोडा नाहीसा होऊन ते अन्नासही महाग झाले ! त्याचे लाखो रुपये सरदाराच्या दौलतीवर येणे होते, त्या दौलती बसल्या, व त्यामुळे त्याचें सर्वस्व गेले ! अनगळ, ताबेकर, चानवळे, गद्रे व पराजपे इत्यादि नाईक मडळीजवळ खते मात्र राहिली. सरदार म्हणू लागले की, ' आमच्या दौलती गेल्या आता जातसरजाम मात्र राहिले आहेत तुमचा पैसा घेऊन फौजेस घातला तो आता आम्ही कोठून द्यावा ? बापू कृपाराम ब-हाणपूरकर याचे बापू गोखल्याकडे तीन लाख रुपये येणे होते. याचप्रमाणे दुसरे लोकाचेही देणे घेणे होते गोखले मेले त्या दिवसापासून बापू कृपाराम याचा रोजगारच बुडाला. पुढे दौलतीचे कर्जाचा उपद्रव सरदारास होऊ नये म्हणून त्या लोकाचे पट करून पुण्यात एक त्याकरिता एजेटी स्थापून असा ठराव केला की, 'त्याशिवाय दुसरे कोडतानें त्याजवर हुकुमनामे करू नयेत ' असे ठरवून त्याचा बचाव केला. परतु येणें-करून त्याचे ऋणकरी व पदरची मडळी याचा तरणोपाय झाला नाहीच

देशमूख घराण्याला हे अरिष्ट जास्तच बाधलें असे वर म्हटलें आहे. हेच जास्त विस्ताराने आता सागतों. गोपाळरावजींचे वडील हरीपत हे अष्टयाला लढाईत बापूबरोबर असून रावबाजी ब-हाणपुराकडे पळाले त्यावेळी त्याच्या लष्करात होते. एल्फिन्स्टन साहेबानी दिलेल्या दोन महिन्याच्या मुदतीत ते इग्रजाकडे येऊन हजर झाले नाहीत म्हणून त्याजकडे असलेला सरजाम जप्त झाला. बाजीराव साहेबानी पेशवेपदावरचा आपला हक्क सोडून दिल्यावर खुद्द त्याच्याच आग्रहा-वरून हरीपत पुण्यास परत आले व तेथें त्याचे वकील म्हणून राहिले बाजीरावाच्याच रदबदलीने पाचचार वर्षाच्या वाटाघाटीनतर सरजाम हरीपतास १८२४ साली परत मिळाला व त्याचेबरोबर मागील पाच

वर्षांचा वसूलही एक रकमेनें इग्रजानी परत दिला. पेशवाई असताना हात चालत असे, केवळ सरजामी उत्पन्नाखेरीज मिळकतीच्या अनेक वाटा होत्या, तो प्रकार बद होऊन सरजामाचे गाव परत मिळण्या-करिता देखील बाजीरावाना स्वत· मध्ये पडावें लागलें, चार वर्षे विवचनेत खस्ता खाव्या लागल्या त्या सर्व प्रकाराचा परिणाम हरी-पताच्या मनावर फार विलक्षण झाला. एल्फिन्स्टन साहेबानी पेशवाई बुडवली ही गोष्ट ते आजन्म विसरले नाहीत साहेबबहादूर पुढें कमिशनर व गव्हर्नर असताना मधून मधून पुण्यास येत व त्याची स्वारी पुण्यातून फिरावयास वगैरे निघे शुक्रवारात देशमुखाचा वाडा आहे त्या बाजूनें स्वारी कधीकाळी गेलीच तर त्या साहेबाचे तोंड पाहण्यास नको म्हणून ते खिडकीकडे पाठ करून बसत असे सांगतात. जुन्या पिढीतील माणसाच्या मनोभावना किती तीव्र असत याचें हें एक चागलें उदाहरण आहे. तें कसेंही असो बदललेल्या परिस्थितीला अनुसरून आपणही बदललें पाहिजे त्याशिवाय, केवळ जुने खान-दानीचें घराणें म्हणून, फार दिवस निभाव लागणार नाही ही मात्र जाणीव त्याना खरोखरीच असावी या वयांत स्वत· एकादा नवीन उद्योग करण्याजोगी त्याची स्थिती नव्हती. त्याचे वडीलपुत्र परशराम-पंत हेही अगोदरच कर्ते व संसारी बनले होते. चिंतोपत व गोपाळराव या दोन लहान मुलांना मात्र बदललेल्या परिस्थितीला अनुरूप असे शिक्षण देण्याची त्याचो इच्छा व तयारी असावी असें गोपाळरावां-च्या लहानपणच्या ज्या चारदोन गोष्टी नमूद आहेत त्यांवरून दिसतें. त्याचा उल्लेख प्रसगानें पुढें येणारच आहे हरी-पतास एकदर चार पुत्र होते. त्यापैकी पहिले परशरामपत हे पहिल्या बायकोपासून झालेले, दुसऱ्या बायकोपासून चितोपत, गोपाळराव, व गोविंदराव असे तीन. यापैकी गोपाळराव हे आमचे चरित्रनायक

होत त्याच्या बालपणासबधानें थोडीच पण विश्वसनीय व मनोरजक माहिती त्याच्या घरच्या कागदपत्रातून सांपडते ही एक सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे. कारण, आमच्या इकडे कोणाचे चरित्र लिहावयाचें झालें तर माहिती मिळत नाही ही अडचण नेहमीच ऐकू येते. पण त्यातल्या त्यांत चरित्राचा जो नायक असेल त्याच्या लहानपणची माहिती तर मुळींच मिळत नाही घरचे खाजगी कागदपत्र, दररोजची टिपणें, मित्रांचा किवा आप्तेष्टाचा पत्रव्यवहार, वगैरे अशा कामाला उपयोगी पडणाऱ्या कागदपत्राची किमत आम्हांला कळू लागली नाही. अगोदर अशा प्रकारची टिपणें कोणी फारशी करीत नाही व केलीच तर करणाऱ्याच्या मागे कोनाकोपऱ्यात पडून, कसरीने खाऊन, किवा रद्दीच्या गठ्ठ्यातून वाण्याच्या दुकानापर्यंत पोचून ती नाहीशी होतात. व मग एकादा माणूस मोठेपणी विद्येने, कर्तबगारीने, प्रसिद्धीला आला म्हणजे त्याच्या बालपणची आपण चौकशी करू लागतो. मग व त्यांचें कुलशील मूळपासूनच फार चागले होते, आईबाप फार सच्छील, पापभीरु होते, मोठेपणाची लक्षणे बाळपणीच त्याच्या अगी दिसत असत, अशा तऱ्हेची सामान्य विधाने करून आम्ही मोकळे होतों, किवा विशेष गोष्टी किवा प्रसग याची माहिती दिलीच तर ती इतकी तिखटमीठ लावून सागतों की, त्यावरून त्या माणसाच्या सामान्य स्वभावाविषयी वाचकाना फारसा बोध होऊ नये. गोपाळराव-जीच्या चरित्रासबधानें मात्र सुदैवाने तशी स्थिती नाही ज्या काही दहापांच गोष्टी माहीत आहेत त्या विश्वसनीय अशा आहेत, व त्यामुळें लहानपणची परिस्थिती, स्वभाव, वर्तन, विचार, विकार इत्यादी गोष्टी समजण्याला अडचण पडत नाही.

गोपाळरावाचा पिड लहानपणापासून बळकट होता, शरीराची काठी उच असून रूप, बांधा या सर्वच गोष्टी सरस होत्या. कपाळ

विस्तीर्ण, पाणीदार डोळे, गौरवर्ण, छाती, गाल पिढच्या इत्यादी अवयव भरदार असल्यामुळे लहानपणीच पाहणाऱ्याच्या मनावर त्यांची छाप पडत असे, असे सागतात.

* या वयापासूनच त्याचा स्वभाव मोठा दिलदार होता. समवयस्क मुलांशी त्याची कधी भाडणे होत नसत, इतकेंच नाही, तर इतर मुले भाडली तर त्याची ती भाडणे मिटवण्याकडेच गोपाळरावाचा कल दिसून येई. अशाच प्रकारची एक गोष्ट त्याच्या घरच्या कागदपत्रात सापडते ती अशी एकदा असे झाले की, शेजारचीं मुले खेळत असता एकाचा चेंडू दुसऱ्या मुलाच्या अगणात पडला व तेथील मुलास तो सापडला दुसऱ्या दिवशी पुन्हा मुले खेळावयाला जमली तेव्हा पहिल्या मुलानें आपला हरवलेला चेडू ओळखला व त्यावरून भाडण सुरू झाले गोपाळ (राव) मध्यें पडले, व त्यानी त्या मुलाची योग्य ती समजूत घालून ज्याचा चेडू त्याला परत देवविला. व ज्याला तो सापडला होता त्याला आपला देऊन त्याची समजूत केली. उदाहरण लहान खरे, पण गोपाळरावही त्या मुलातलेच एक मूल होते ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे त्याचे महत्त्व कळते.

* त्याचप्रमाणे समवयस्क अशा मुलात खेळतांना आपण उच अशा ठिकाणी बसून इतराची भाडणे तोडावयाची, व आपल्या समजुतीप्रमाणे त्याना उपदेशाच्या दोन गोष्टी सागावयाच्या अशा प्रकारचे खेळच गोपाळराव त्या वेळीही आपल्या बालमित्रांबरोबर खेळत मोठेपणी लोकाच्या हिताकरिता लेखन व कृती अशा दोन्ही

---

* अशी खूण केलेल्या " लो० हि०च्या बालपणातील गोष्टी रा० कृ. ना आठल्ये यानीं लिहिलेल्या चरित्राच्या आधारें घेतल्या आहेत हें चरित्र विस्तृत आहे व तें लवकरच प्रसिद्ध होणार आहे असें कळतें.

रीतीनें ह्मणणाऱ्या लोकहितवादी गोपाळरावांचे पाय गोपाळाच्या पाळण्यांत दिसू लागले होते

*गोपाळरावाच्या शिक्षणाला सुरवात त्या वेळच्या रीतीप्रमाणे थोड्याशा जुन्या पद्धतीनेंच झाली असेल हे कांही सांगावयास पाहिजे असें नाही. मुंज होण्यापूर्वी बालबोध व मोडी लेखनवाचन, तोंडच्या हिशोबापुरतें गणिताचे ज्ञान, या पलीकडे त्यांचे व्यावहारीक शिक्षण गेलें नव्हतें पण त्याच्याच बरोबर सध्याकाळच्या मगल वेळी देवापुढें किंवा दिव्यापुढे बसून, देवाचे श्लोक, आरत्या त्याप्रमाणेच तिथी, वार नक्षत्रे याची नावें वगैरे जुन्या श्रद्धाळू मंडळीच्या समजुतीप्रमाणें शिकण्याजोगत्या ज्या गोष्टी त्या त्याना सर्व लहानपणीच शिकविल्या होत्या मौंजीबंधनानंतर संध्येच्या पाठाना सुरवात झाली. त्या वेळची एक गोष्ट नमूद केलेली आढळते ती महत्त्वाची म्हणून येथें दिली आहे शिष्याची बुद्धी विशेष चलाख असल्यामुळें चारआठ दिवसातच त्याची संध्या पाठ झाली पण हे मंत्र कशाचे, त्याचा उपयोग कोणता व अर्थ काय अशा शंका त्याच्या मनाला येऊ लागल्या. म्हणून पाठ चालले असतांच त्याने गुरुजींना मंत्रांचा अर्थ सांगण्याची विनंती केली. गुरुजी साधेभोळे वैदीक ब्राह्मण होते. त्यांचें वेदविद्येचे ज्ञान कर्मठपणाला पुरेसे होते व त्यांनी स्वतः कधी मंत्रांच्या अर्थाची चौकशीही केली नव्हती मंत्राना अर्थ असावेत अशी त्यांना कधी शंकाही आली नसेल, तेव्हां शिष्याच्या प्रश्नानें त्याना गोंधळल्यासारखे झालें. चार दोन दिवस आज उद्यां करून त्यांनी टाळाटाळी करून पाहिली व शिष्य पिच्छा सोडीत नाही असें पाहून त्याचे अध्ययन पुरें झाले आहे, आमची जरूर राहिली नाही असें वडिलाना कळवून रजा घेतली.

गोपाळरावाचा विवाह व्रतबंधानंतर लवकरच वर्ष दोन वर्षांत झाला.

त्यावेळी त्याचा अभ्यास पुणें येथील मराठी शाळेंत चालू होता. त्यांना गोळे घराण्यांतील सरदार दाजीसाहेब गोळे यांची कन्या दिली होती. त्या काळाला व विशेषतः सरदार घराण्याच्या चालीरीतींना इतक्या लवकर मुलामुलींचें लग्न होणें ही गोष्ट अनुरूपच असल्यामुळे तिजविषयी येथे विशेष चर्चा करण्याचे कारण नाही. मराठी शाळेतील अभ्यास संभाळून गोपाळराव घरी इंग्रजी शिकत. मात्र घरीं, यावनी भाषेच्या पुस्तकाचा विटाळ होऊ नये म्हणून म्हणा किंवा तशाच इतर कारणानें म्हणा, परसातील विहिरीत एक मोठा कोनाडा होता त्यात जाऊन ते वाचीत बसत असत. इंग्रजी शाळेंतून घरी परत आल्यावर अंगरखा पागोटें काढून शुचिर्भूत होऊन मग त्याना घरात यावें लागे.

त्या वेळच्या व त्यातल्या त्यात विशेषत सरदार घराण्यातील तरूण मुलाना पोहणें, घोड्यावर बसणें, निशाण मारणें वगैरे कलाचें शिक्षण मिळणें हें अवश्यक वाटत असे गोपाळरावानाही असें शिक्षण मिळालें होतें. लहानपणी पर्वतीच्या तळ्यात पोहण्याची त्याना फार हौस होती. अशा एका प्रसंगी बुडणाऱ्या एका समवयस्क सोबत्याला धाडसाने वाचविल्याची त्याची एक गोष्ट सांगतात. त्याच-प्रमाणें त्यांच्या निशाण मारण्याच्या कौशल्याचीही एक आख्यायिका आहे, ती त्याच्या धैर्याची व समयसूचकपणाची दर्शक असल्यामुळे येथें देतों.

* एके दिवशी सकाळच्या प्रहरीं गोपाळराव संगमाच्या बाजूस फिरावयास गेले असतां तेथें एके ठिकाणी काहीं गोरे सोजीर निशाण मारण्याची कवाईत करीत होते, त्यांकडे त्याचें लक्ष वेधलें. शिपाई नवे असून त्याचा अमलदार त्याना बंदूक धरावी कशी, नेम कसा मारावा हें शिकवीत होता. बहुतेक वेळा निशाणावर गोळी न

लागतां भलतीकडेच लागे हें पाहून गोपाळरावास रहावेना. ते पुढें गेले व यांना निशाण मारता येत नाही तर हे शिपाई कसले! असें थोडेसें आश्चर्यानें, कदाचित् आपली वरचढ दाखविण्याच्या हेतूनें असेल—त्यानी विचारिले. अमलदारालाही या तरुण मुलाच्या धाडसाचे, चौकसपणाचें नवल वाटलें असावें असें दिसतें. तो म्हणाला, 'होय, तें खरें. बिनचूक निशाण मारणें ही गोष्ट काही—सोपी नाही. तुम्हाला येत असले तर तुम्ही दाखवा पाहू मारून.' गोपाळरावानी होय म्हटलें. व लागलीच त्या शिपायापैकीच एकाची बदूक मागून घेतली व निशाणावर नेम धरून अचूक गोळी मारली, त्यामुळे तर त्या अमलदारास विशेषच कौतूक वाटलें व त्यानें तुम्ही कोण वगैरे चौकशी करून गोपाळरावाना आपल्या वरिष्ठाकडे नेले. तेथेंही गोपाळरावानी विचारलेल्या प्रश्नाची उत्तरे धिटाईनें दिली. त्या वेळचे गोरे अमलदार येथील लोकाशी मोठ्या बेतानें वागत असत. इग्रजी अमल नवीनच होता, अजून सरकारच्या बदोबस्ताची घडी नीट बसावयाची होती व त्यामुळे लोकाना खूष ठेवून, त्याचे कौतूक करून व त्याच्यात मिळून मिसळून अमलदार वागत. त्याप्रमाणें साहेबाने मुलाच्या धिटाईचे व निशाणबाजीचे कौतूक केलें, त्याला शाबासकी दिली व त्याच्या घरी पत्र लिहून मुलगा सैन्यात नोकरीस येत असेल तर त्याला चागली जागा देऊ असें कळविलें. पण हरीपताच्यानें मुलाला सैन्यांत पाठविण्याचा हिय्या झाला नाही व गोपाळराव घरीच राहिले. त्याचा लौकीक शिपाईपेशामुळे व्हावयाचा नसून तो लेखक व समाजसुधारक म्हणून व्हावा असा ईश्वरी सकेत होता.

अशा रीतीनें गोपाळरावाचा अभ्यास चालला असता, त्याच्या घराण्यावर एकाएकी दुःखाचा डोंगर कोसळला. त्याचे सावत्रबधू परशराम

हे वडिलांच्या वृद्धापकाळामुळें नुकतेच घरचा कारभार पाहू लागले होते, ते सन १८३५ साली अगदी तरुण वयांतच वारले. वडिलाच्या मनानें हाय घेतली व मागून थोड्याच दिवसात पुत्रशोकानें त्याचाही अत झाला त्यातच आणखी एका आपत्तीची भर पडली त्याच्या वडिलाना मिळालेले सरजामाचे गाव सरकारने जप्त केले. हरीपताच्या हयातीपर्यंतच ही जहागीर चालावयाची असा सरकारचा ठराव होता असें याला कारण देण्यात आले. हरीपताना हें पूर्वींच कळवले होतें किंवा नाही याविषयीची कांहीच माहिती लागत नाही. परतु ते कसेंही असले तरी मागे राहिलेले कुटुब व दोन लहान मुले यांच्यावर आलेल्या आपत्तीत या प्रकाराने भरच पडली येवढी गोष्ट मात्र खरी वडील चिरजीव चिंतोपत हे या वेळी १६।१७ वर्षांचे होते व गोपाळराव हे १२।१३ वर्षांचे होते. अशा स्थितीत घराण्याचा लौकीक सभाळून पुढे चालवावे कसे असा कुटुबातील माणसास पेंच पडला थोरले बधू चितोपत हे जहागिरीसबधाने खटपट करण्याच्या व घरचा व्यवहार पाहण्याच्या मार्गाला लागले गोपाळराव व त्याहूनही धाकटे यानी विद्याभ्यास चालू ठेवावा असे ठरले. गोपाळरावाना विद्याभ्यास जास्तच झटून करण्याची गरज उत्पन्न झाली. काही दिवस खटपट केल्यानतर चितोपताना थोडेंसे यश आले. जहागीर परत मिळाली नाही, पण हरीपताच्या कुटुबास सालीना ६०० व तिघा मुलास प्रत्येकी २०० रुपयाची नेमणूक सरकारनें करून दिली व मुलानी सरकारची नोकरी केल्यास नोकरीच्या मुदतीत नेमणूक तात्पुरती बद होईल असे ठराविलें.

या खटपटीमुळेच गोपाळरावाच्या आयुष्याला एक विशेष वळण लागलें असें म्हणता येईल. नेमणुकी मिळाल्यानी तात्पुरती गरज भागली खरी, पण त्यात एवढी एक गोष्ट झाली की, सरकारची

नोकरी किंवा दुसरा व्यवसाय केल्याशिवाय चरितार्थ चालावयाचा नाही यामुळें कदाचित् असेल, पण एकदोन वर्षातच गोपाळरावाची शाळा सुटली व ते पुणे येथील न्यायाधीश रा० सा० पाटणकर व मामलेदार अमृतराव आप्पाजी रानडे यांचे कचेरीत उमेदवार म्हणून कामाची माहिती शिकण्याकरिता राहिले. तीन चार वर्षांत सरकारी पत्रव्यवहार, हिशेबाची पद्धत, वगैरे गोष्टींची बरीचशी माहिती त्यानी करून घेतली. घरी त्यातच इंग्रजीचा अभ्यास चालू होता, पण इंग्रजी पत्रव्यवहाराची वगैरे माहिती नसल्यामुळे कचेरीत दप्तराकडे त्याचा उपयोग होत नसे. त्यावेळी सरकारी कचेऱ्यातून बहुतेक मराठीच असे. इंग्रजी शिकलेले लोक एकदरीत थोडे असल्यामुळे त्याच्यावर कामाचा भार विशेष पडे, व त्याना त्या मानाने पगारही चागले मिळत आपलें इंग्रजीशिवाय अडते ही गोष्ट गोपाळरावाच्या लवकरच लक्षात आली व त्यामुळे उमेदवारी सोडून वयाच्या अठराव्या वर्षी ते पुनः शाळेत—बुधवारच्या इंग्रजी शाळेत—जाऊ लागले. सरदारी थाटाचे लहानपणापासून वळण, वाढलेले वय, चार वर्ष शाळा सुटून व्यवहाराची लागलेली सवय, व वाढता प्रपच या अडचणी लक्षात घेतल्या म्हणजे त्याना न जुमानता पुनः शाळेची पायरी चढणाऱ्या गोपाळरावाची ज्ञानलालसा फारच जबर असली पाहिजे असे म्हणणें प्राप्त आहे. असो, बुधवारच्या शाळेत गोपाळरावानी एकदर ३ वर्षे काढली त्यावेळीं Eisdale या नावाचे साहेब शाळेचे हेडमास्तर होते, त्याच्या हाताखाली गोपाळरावानी इतिहास व इंग्रजी या दोन विषयाचा विशेष अभ्यास केला. १८४४ साली त्यांनी स्कूलबोर्डाची शेवटची परीक्षा दिली तीत या दोन विषयात त्याची फारच हुषारी दिसून आली, असा शेरा परीक्षकानी मारलेला आहे. त्याचप्रमाणे Eisdale साहेबानी गोपाळरावांस शाळा सोडताना उत्तम शिफारसपत्र दिलें

व परीक्षक मंडळींनीही त्याच्या गुणाचे कांहीं तरी चीज स्कूलबोर्डाने करावे अशी शिफारस केली ही दोन्ही शिफारसपत्रें येथे उतरून घेतली आहेत.

**From the report of the Board of Education for 1844**

I "One pupil Gopall Harce Deshmookh has distinguished himself, and deserves to have his name handed up to the Board as a good English Scholar and worthy of its patronage

A II Gopallrao Deshamukh entered the Poona Government English School in February 1841. He had previously acquired a considerable knowledge of English and he distinguished himself by the progress he has made since he commenced attending the School He has a very good knowledge of General History, translates remarkably well from English into Marathi and composes in English in a style superior to what is commonly to be met with among nations who profess to write that language He knows arithmetic and a little of mathematics and writes a good hand

I entertain a very favourable opinion of his abilities and general character and consider him well qualified to fill a situation of respectability

Poona,
9th may 1844

(Sd) D A Eisdale, Headmaster
Poona G E School

त्या शिफारशीचा उपयोग ताबडतोब झाला व गोपाळरावास त्याच वर्षी पुणे येथील सरदाराचे एजंट याचे कचेरीत दरमहा ७७ रुपयावर कारकुनीची नोकरी मिळाली. लवकरच कामात त्याची हुषारी दिसून येऊ लागली व त्यांना त्याच ऑफिसांत मुख्य कारकुनाची जागा मिळाली. हें कचेरीतले काम सभाळून सभा, व्याख्याने

इत्यादी लोकोपयोगी चळवळींत गोपाळराव सवडीप्रमाणें पडत असत. त्या वेळच्या सर्वच चळवळी सामाजीक किंवा शिक्षणविषयक असल्यामुळें सरकार व लोक असा विरोधाचा प्रकार त्या ठिकाणी नव्हता. व त्यामुळें एतद्देशीय सरकारी नोकर चळवळींत पडत इतकेंच नव्हे, तर वरचे युरोपियन अधिकारी देखील शक्य तितकें प्रोत्साहनच देत असत. पुणे येथे एक वाचनालय स्थापावें अशा प्रकारची चळवळ येथील न्यायाधीश ब्राऊनसाहेब, व गव्हर्नर साहेबांचे चिटणीस कॅप्टन् फ्रेंच साहेब, यांच्या प्रोत्साहनानें सन १८४७ सालीं चालू झाली व तिला मूर्त स्वरूप येऊन एका वर्षाच्या आत The Poona Native General Library नावाची संस्था १८४८ सालीं स्थापनही झाली. त्याप्रमाणेंच सन १८४०च्या सुमारास विष्णुशास्त्री बापट या गृहस्थानीं पुण्यांत पहिल्यानें पुनर्विवाहाला अनुकूल असें मत प्रतिपादन करण्यास सुरवात केली होती व या विषयाची चर्चा त्या वेळीं पुण्यांत चालू होती. अशा प्रकारच्या इतर अनेक गोष्टींचें निरीक्षण मार्मिकपणानें गोपाळराव करीत होते. सन १८४८ सालीं "प्रभाकर" नावाच्या पत्रांत शंभरावर पत्रें लिहून पुणे येथील महाराष्ट्रीय समाजांतील चळवळींची माहिती त्यानीं दिली आहे. व त्याचप्रमाणें तत्कालीन समाजांतील व्यंग व दोषस्थळें दाखवून त्यावर चुरचुरीत टीकाही केली आहे. या पत्रामुळें पुण्यांतील पुराणमताभिमान्यांचा त्यांच्यावर बराच रोष झाला असावा असें दिसतें. या रोषाला, व तज्जन्य कुत्सित टीकेला शेवटच्या पत्रांत उत्तर देऊन त्यांनीं या शतपत्रांचा समारोप केलेला आहे. हींच पत्रें पुढें ३० वर्षांनीं ग्रंथरूपानें एकत्र छापून निघालीं व निबंधमालाकाराच्या रोषाला पात्र झालीं, ती एक स्वतंत्र कथाभागच असल्यामुळें त्यांचें विवेचन पुढें करण्याचें अभिवचन देऊन तूर्त चरित्राकडेच वळतों.

प्रभाकर वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेल्या पत्रांचा उल्लेख नुक्ताच आला आहे. त्याच अनुरोधानें येथे हेही सांगून ठेवणे इष्ट वाटतें की, वर्तमानपत्रांत लेख लिहून सामाजीक व राजकीय प्रश्नाविषयी लोकमत जागृत करण्याचा गोपाळरावजींनी केलेला हा केवळ आरंभ होता. पुढे लवकरच पुणे येथें ज्ञानप्रकाश हें पत्र त्याच्याच प्रेरणेने निघाले. त्याचप्रमाणे यानंतर सुमारे पंधरा वर्षांनी मुंबईस इंदुप्रकाश पत्र सुरू झालें, तेंही गोपाळरावजीमुळेच होय. अहमदाबाद, ठाणे इत्यादी ठिकाणी नोकरीवर असताना देखील त्यांचा अशा प्रकारचा लेखन-व्यवसाय चालू होताच. वृत्तवैभव पत्रातील त्यांचे लेख, त्याप्रमाणेच बडोदे येथील मल्हाररावासंबंधाने अहमदाबाद येथे वर्तमानपत्रातून लिहिलेले लेख व पेन्शन घेतल्यानंतर लोकहितवादी या नावाचे त्यांनी चालविलेले स्वतंत्र मासीक ही सर्व त्यांच्या राजकीय व सामाजीक प्रश्नांविषयींच्या जीवंत आस्थेचीच उदाहरणें होत. त्यांपैकी बडोदे प्रकरण व लोकहितवादी मासिक यांचा पुन्हा उल्लेख पुढे जरूर त्या ठिकाणी येईलच. तूर्त ज्ञानप्रकाश पत्राशी असलेल्या निकट संबंधा-विषयी दोन शब्द लिहितो.

ज्ञानप्रकाशाच्या पहिल्या एक दोन वर्षांतील लेख त्यांचे कोणते व इतरांचे कोणते हें भाषेच्या लकबीवरून सांगणे कठीण आहे. तथापी विचाराच्या सारखेपणावरून काही अनुमान काढावयाचे असल्यास पुणे येथील शाक्तपंथ, नेटिव अमलदार, संस्कृत पाठशाळा, जुनी शिक्षणपद्धती, देशाचे दारिद्र्य व उद्योगधंदे, ब्रिटिशराज्यापासून फायदे व तोटे इत्यादींसारख्या विवीध सामाजीक व राजकीय विषया-संबंधाने प्रभाकर व ज्ञानप्रकाश या पत्रांतील विचारसाम्य व प्रसंगविशेषी भाषेचें साम्यही इतके विलक्षण आहे की, या लेखाची कल्पना, निदान

प्रेरणा तरी दोन अगदी भिन्न माणसांकडून झाली असे म्हणणें धाडसाचें होईल.

ज्ञानप्रकाशाचे हे जुने अंक चाळून पाहणाराला त्यात दुसरी एक गोष्ट दिसते ती अशी. अतर्मुख दृष्टीनें आपली व्यंगें आपण शोधून आपण सुधारावीत अशा बुद्धीचे "लोकहितवादी" जसे त्यात दिसतात तसेच आलेली हीन स्थिती केवळ इंग्रजामुळे आली व राजकीय सुधारणा झाली म्हणजे बाकी सर्व आपोआप घडून येईल, अशा रीतीनें राजकीय विषयाना प्राधान्य देऊन इतर गोष्टींना गौणत्व देणारे "यथार्थ-वादी" ही त्यात आहेत. लोकहितवादींनी आत्मनिंदा करून आपल्या लोकाचा तेजोभंग केला अशा अर्थाची छटा पुढे निबंधमालाकाराच्या टीकेत जी दिसते तशाच अर्थाचा आक्षेप यथार्थवादी यानीही गोपाळ-रावांच्या लेखांवर घेतला होता, हें वाचकाच्या सहज लक्षात येईल. समाजाच्या सर्वांगीण सुधारणेत राजकीय सुधारणा हा एक महत्त्वाचा खरा पण अंश आहे असे प्रतिपादन करणारे पुढील पिढीतील "सुधारक" हे लोकहितवादींचे पुढल्या पिढीचे वारसदार. तसेच आधी राजकीय ( व ) मग सामाजीक अशा तऱ्हेचा निष्कारण वाद वाढवून निदान एक पिढीपर्यंत तरी समाजसुधारणेच्या गाड्याला खीळ घाल-ण्याचे पुण्य पदरी जोडणारे " उद्धारक " हें यथार्थवादींचे खरे वंशज. या दोन्हीही प्रवृत्ती आरंभापासूनच महाराष्ट्राच्या विचारात होत्या. यापैकी अधीक उपयुक्त कोणती, अतर्मुख सामाजीक प्रवृत्ति की बहिर्मुख राजकीय, या प्रश्नासंबंधी सर्वांस मान्य असा अखेरचा निर्णय आज निदान बाहेरच्या बोलण्यापुरता तरी लागलेला दिसतो. आणि येवढ्यापुरता लोकहितवादींच्या विचारसरणीचा अचुकपणा आज तीन पिढ्यानंतर मान्य झाला असेंही म्हणता येईल.

सन १८४६ साली गोपाळरावांनी मुनसफीची परीक्षा दिली होती.

परंतु मुनसफीची जागा मिळण्यास त्यांना पुढे सहा वर्षे वाट पाहावी लागली. सन १८५२ साली वाई येथें त्यांची पहिल्यानें नेमणूक झाली. त्याचो तैलबुद्धी व अविश्रांत श्रम करण्याची हौस व विशेषतः त्यांचा निःस्पृहपणा व परोपकारी स्वभाव या गुणामुळे त्या ठिकाणी ते वरिष्ठ अधिकारी व लोक या दोघानाही सारखेच प्रिय झाले. त्याच्या कामासबधाने जुडिशियल कमिशनर यानी खालील उद्गार काढले आहेत: —

"I have a very high opinion of his abilities They are of very high order His character is above suspicion and he appears to combine with them an earnest desire to discharge his duties conscientiously."

अधिकारी या नात्याने त्याच्या हाताखालचे कारकून, शिपाई यांच्याशी वागणूक फार ममतेची असे. याविषयी वाई येथें घडलेली म्हणून त्याचो एक गोष्ट कळते ती अशी. कोर्टाची तपासणी करण्या-करितां वरिष्ठ अधिकारी येणार आहेत अशी अगाऊ सूचना एके दिवशी (हा दिवस शनवार होता) आली तपासणी सोमवारी व्हावयाची होती. कारकुनापाशी तपास करिता बारनिशी दप्तरातील काम कारकून आजारी असल्यामुळे तसेच शिल्लक आहे असे गोपाळरावास कळले. बरे आहे, उद्या रविवार आहे, होईल तेवढे आटपा असे सांगून ते घरी गेले व दुसऱ्या दिवशी सकाळी स्वतः कचेरीत येऊन बारनिशी दप्तर सोडून लिहावयास बसले. बिचारा बारनिशी कारकून जेवणखाण आटोपून एकदमच लवकर कचेरीत आला तों मुनसफसाहेब स्वतःच लिहीत बसले आहेत. हें पाहून तो फार खजील झाला व कदाचित् साहेब रागावतील म्हणून भयानें अगदी गागरून गेला. गोपाळराव रागावले तर नाहीतच पण, "तुमचे काम मी बरेंचसें आटपलेंच आहे, आतां राहिलें आहे तें संध्याकाळपर्यंत आटपा म्हणजे

झाले." अशी त्यांनी उलट त्याची समजूत केली व ते स्नानभोजना-करितां घरी गेले.

याच सुमारास म्हणजे १८५३ साली पावसाळ्यात वाई येथें कृष्णाबाईस भयकर पूर येऊन सबध दोन आळ्या वाहून गेल्या व पुष्कळ नुकसान झाले. कित्येकानी कमरेस लाद्याचें पीठ बाधून कित्येक दिवस देवळाच्या शिखरावर बसून काढले. यावेळी गोपाळरावाच्या मदतीचा गोरगरिबाना पुष्कळ उपयोग झाला असेल हे सागणे नकोच. 'ऐतिहासिक गोष्टी' या त्याच्या पुस्तकात वाई येथील या महापुरा-सबधाने लहानसें टाचण छापलेले आहे

वाई येथें कामावर असताना काही दिवस, साताऱ्याचे त्यावेळचे एक मुख्य सदर अमीन याचेवरील लाचाचे खटल्यात, गोपाळरावांस असेसर नेमिले होतें याच सुमारास मुबई सरकारने इनाम कमिशन नेमिले व त्यात त्याची कमिशनरचे दुय्यम, Assistant म्हणून दरमहा ३०० रुपयावर नेमणूक झाली याच ऑफिसात त्यास हळू हळू बढती मिळून त्यांच्या कामाची बरीच वाहवा झाली त्यामुळे त्या वेळच्या मडळीत व विशेषत. ज्याची इनामें बुडाली त्याच्या मनात असा किंतू उत्पन्न झाला कीं, इनाम कमिशनरानी सरकारास खूष करण्याकरिता आपल्या लोकाची इनामें मुद्दाम बुडविण्यास मदत केली. हा आक्षेप कित्येकानी गोपाळरावाच्या चारित्र्यावरही घेतला आहे. याकरिता इनामकमिशनचे काम व त्यासबधी त्याची जबाबदारी या विषयी चार शब्द लिहितों. ही माहिती बरीचशी अपुरी आहे, पण मुळीच नाही त्यापेक्षा काहीतरी असलेली बरी या नात्यानें तिचा उपयोग वाचकानी जपून करावा एवढीच त्याना सूचना देऊन ठेवतों.

**इनामांची पेशवाई अखेरच्या काळांतील स्थिती.** पेशवाईच्या चढत्या काळात व विशेषतः नाना फडणीसाचा जम पुण्यास

चांगला बसल्यापासून इनामें, जहागिरी, वर्षासनें, सरंजाम, इत्यादी देणग्यांची, पुणें दरबारांत नोंद जेव्हांची तेव्हां केली जात असे. ही नोंद पेशव्यांच्या हुजूर रोजकीर्दीत दफ्तरांत होई व त्या ठिकाणीं इनाम किंवा वर्षासन, काय असेल तें, कोणाला दिलें, कधीं, कां, कशाकरितां, वगैरे सर्व गोष्टींची माहिती दिलेली असे. पुष्कळ इनामें फंदफितूर वगैरे कारणांनीं जप्त होत असत असेंही दाखले आहेत. नानांच्या मृत्यूनंतर फडाची शिस्त मोडली, मामलती मक्त्यानें जाऊं लागल्या, कमावीसदार, सुभेदार, आपापल्या प्रांतांत स्वतंत्रपणानें वावरूं लागले, दरबाराकडून त्यांचा बंदोबस्त किंवा वेळप्रसंगीं त्यांची कुमक होईनाशी झाली, त्यामुळें प्रांतोप्रांतीं देशपांडे, देशमुख, पाटील अशी वतनदार मंडळी पुंड होऊन गांव, मुलूख, गड बळकावून बसली. होळकरांनीं केलेल्या पुणें शहराच्या लुटीच्या वेळीं सरकारचें पुष्कळच कागदपत्र नाहींसे झाले असतील. त्याचप्रमाणें त्या बेबंदशाहींत पुष्कळांनीं खरेखोटे कागद केले असतील, ही गोष्ट अगदीं संभवनीय आहे. पेशव्यांच्या वेळीं देखील अशा प्रकारचे घोटाळे वेळप्रसंगीं होत नसतील असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. मध्यें मध्यें पुण्यास ज्या बारभाईंच्या उलाढाली झाल्या त्यावेळीं असा प्रकार बराच झाला असेल-झाला होताही. पण नवे धनी गादीवर आले म्हणजे दर वेळीं पुन्हा एकदां इनाम सरंजामाची तपासणी होई व प्रत्येक वेळीं, चुक्या, लबाड्या वगैरे असत त्या दुरुस्त होत असत. पेशवाई अखेर असें कांहींतरी होणें साहजीकही होतें, व त्याच वेळेला तें सरसहा व कायदेशीरपणानें झालें असतें तर पुढें जी इनामासंबंधीं इतकी ओरड झाली ती झालीही नसती. त्यावेळीं नवीन मुलखाची व्यवस्था करणारे कमिशनर एल्फिन्स्टन याच्या लक्षांत ही गोष्ट आली होती. परंतु नवीन मुलुखांत बंदोबस्त करणें, शांतता स्थापन करणें वगैरे जास्त महत्त्वाच्या कामांत

त्याचें लक्ष गुतल्यामुळें तें काम त्याच्या हातून त्यावेळी झाले नाही असें दिसतें फक्त जे बाजीरावसाहिबांबरोबर बरेच दिवस राहिले किंवा ज्यानी फितूर वगैरे करण्याचा प्रयत्न केला अशाचीं इनामें त्यावेळी जप्त केली. पण केव्हातरी विशेष बारीक चौकशी झाली पाहिजे असे त्याचे मत त्यावेळी होते व ते चुकीचे होते असे म्हणता येणार नाही मनरो व एल्फिन्स्टन याच्या पत्रव्यवहारातले दोन लागू पडणारे उतारे खाली देतो. त्यावरून मी काय म्हणतों हे वाचकाच्या लक्षांत येईलच.

For instance, when writing to the Hon Mr Elphinstone in a letter dated 8 th March 1818 in the camp near Belgaum, Munro says on the subject of the charitable and religeous expenses in these ( S M C ) districts

"A large portion of them will be found to have risen from unauthorised grants and other frauds The wholee should be carefully investigated after peace is restored and the country settled and such part of the expenditure as is of modern date and not duly authorised should be stopped This course is followed by native Governments at every new succession and frequently more than once in the same reign

Again in a letter to Mr Elphinstone dated 28 th August 1818, he writes

"Many Inams will be found on examination to have been clandestinely given by revenue officers without authority.

Every one from the kurnum of a village to the Subha of the Carnatic, grants both lands and pensions The Sursubha or his deputy, when he is about to quit his office fabricates a number of Inams He gives away some and sells the rest The new Sursubha resumes some but continues a part of them When such Inams have not, by long possession, become in

some degree the fair property of the possessors, they ought to be resumed

नवीन मुलखाची व्यवस्था लागत असतानाच पेशव्याच्या दप्तराची पाहणीही पुणें मुक्कामी सुरू होतीच. ती कशीबशी १८३५ च्या सुमारास सपून इनामाची चौकशी १८४३ साली सुरू झाली. त्या वेळी "पुण्याचे दप्तर" बाळाजीपत नातू व इतर चार अमानतदार याच्या ताब्यात होते. व त्याच्या देखरेखीखाली इनामाची विशेष चौकशी चालू होती इनाम कमिशनरानी प्रत्येक इनामाची चौकशी करून सरकारकडे शिफारस करावी व त्याप्रमाणे गव्हर्नर इन् कौन्सिल यानी अखेरचा निकाल द्यावा अशी व्यवस्था पहिल्याने काही दिवस चालली. पण यामुळे कौन्सिलचें काम फार वाढत चालले. त्याहीपेक्षां विशेष अडचण म्हणजे दिवस चालले होते ही होय. पेशवाई सपून जवळजवळ एक पिढी या वेळी लोटून गेली होती व यामुळे चौकशीची दिरगाई चालू ठेवणे म्हणजे पुढे, ज्याची चौकशी सपली नव्हती त्यांची, कुचबणा करणे होते. काय तो सोक्षमोक्ष एकदा झालेला बरा असेंच त्यांना वाटत असल्यासही कांही नवल नाही. ज्यांची इनामें खालसा व्हावयाची त्याना अन्याय झाला असता, असें म्हणून सरकारच्या कायदेपडितानी कायद्याच्या अडचणी काढल्या यामुळे अखेरीस कपनीचे विलायतेतील डायरेक्टर, हिदुस्तान व मुबई सरकारें यांचा बराच पत्रव्यवहार होऊन सन १८५२ साली इनामाबद्दल एक कायदा हिदुस्थानसरकारने पास केला. व त्याप्रमाणे मुबई इलाख्यात त्या इनामाची सरसहा चौकशी करण्याकरिता एक कमिशन सरकारनें नेमिलें.

कमिशननें आपलें काम कोणत्या पद्धतीनें चालवावें, निरनिराळ्या प्रकारच्या इनामांसंबधी, प्रश्न विल्हेस लावताना कोणतें धोरण ठेवावें वगैरे बाबतीसबधी नियम सरकारानेंच घालून दिलेले होते व त्याप्रमाणें

चालणें हें कमिशनच्या प्रत्येक कामगाराचें कर्तव्यच होतें. तेव्हा या बाबतीत गोपाळरावांबद्दल आक्षेप घेणें शक्य आहे ते खालीलप्रमाणें:—

(१) असल्या प्रकारच्या कमिशनमध्ये नोकरी करणें हें कितपतसे योग्य होतें ?

( २ ) नोकरी पत्करिल्यानंतर त्यानी आपले काम चोखपणानें केले की नाही ?

पहिल्या आक्षेपाचें उत्तर स्पष्टच आहे. दर नव्या कारकीर्दीच्या आरंभी एकदा व केव्हां केव्हा अनेकदा अशी चौकशी एतद्देशीय राज्यकर्ते करीत असत असे मनरो साहेबानी स्पष्टच म्हटलें आहे. या प्रकारचे अनुकरण परकीय इंग्रज सरकारने केले ही गोष्ट खरी आहे. त्यात दोष असेल तर तो चौकशीचा नव्हे, तो राज्यकर्त्यांच्या परकेपणाचा. ताक नाही म्हणावयाचें असेल तर सासूनें म्हणावे हवे तर, सुनेनें म्हटलें, की बिघडतें असा हा प्रकार आहे. एकदरीत इनाम कमिशनचे उद्देश व कामाची पद्धती यास दोष देता येत नाही असें मला वाटतें. दिरगाई झाली इतकी झाली नसती तर, राज्यक्रांती-पैकींच हा एक भाग होऊन व्यक्तीच्या वर्तणुकीचा प्रश्नच त्यांत उद्भवला नसता. पण दिरगाईचा विचार करताना ती टाळता येणें कितपत शक्य होते हे आक्षेपकानी पाहिलेले नाही. नवीन सरकारापाशी असलेले, थोडे, परके, अननुभवी, व बहुतेक लष्करी पेशांत आयुष्य गेलेले अधिकारी शांतता स्थापन करण्याचें अधीक जरूरीचें काम करीत होते. जुन्या पेशव्यांच्या नोकरापैकी एकादा अनुभवी माणूस नेमला असता तर हें काम लवकर झालें असतें खरें. पण त्या काळी दुसऱ्या बाजीरावाच्या दरबारी मंडळीपैकी असा एकादा पुरुष मिळाला असता की नाहीं याची शंका आहे. त्याचप्रमाणें हें काम कितीही चोख झालें अशी कल्पना केली तरी तें त्या वेळी

तसे किती जणाना वाटले असते हाही प्रश्न विचार करण्याजोगा आहे. झाले ते आवश्यक होते व म्हणूनच ठीकही झाले, असाच अभिप्राय एकदरीत या कमिशनबद्दल द्यावा लागेल

गोपाळरावाच्या हातून व्यक्तिश: गैरवर्तणूक झाली असा आक्षेप कोणी घेत नाही त्याच्यावर आक्षेप एवढाच आहे की, त्यानी सरकारची नोकरी अगदी नेकीने—कदाचित् फाजील नेकीने—बजावली व अशी टीका करताना टीकाकार, गोपाळराव हे नोकर होते ही गोष्ट विसरून कमिशनच्या धोरणासबधाने जे आक्षेप घ्यावयाचे ते त्याच्याच माथी मारतात अर्थातच अशा निष्कारण आक्षेपाना गोपाळरावाच्या तर्फे उत्तर देण्याची जरूरी नाही. कमिशनचे काम सपल्यानतर सरकारने गोपाळरावाच्या कामाचा मुद्दाम गौरव केला व पुढे एका सरकारी सर्विस कमिशनसमोर जस्टिस नानाभाई हरिदास यानी जाहीर रीतीने गोपाळरावाच्या नेकीबद्दल उल्लेख केला, या गोष्टीतच ते उत्तर एक प्रकारें आलेले आहे.

पुढे ता. ४ मार्च १८६१ ला कमिशनचे काम सपले व गोपाळरावाची ही नोकरीही सपली

पण याच सुमारास हिंदू व मुसलमान याच्या धर्मशास्त्रांच्या व्यवहार भागाचे Digest म्हणजे थोडक्यात गोषवारा तयार करण्याचे काम या वेळी मुबई हायकोर्टाने हाती घेतलें होते व त्या कामी हिंदू धर्मशास्त्र व चालीरीती याची माहिती असलेल्या कोणातरी लायक गृहस्थाची नेमणूक करणे जरूर होतें. श्रुतिस्मृतीचे आधार शोधून काढण्याकरिता शास्त्रीपडीत होते, पण प्रत्येक चालीरीतीसबधाने निरनिराळे शास्त्राधार, रूढीचे वेगवेगळे प्रकार, वगैरे असल्यामुळे निरनिराळ्या प्रकारांचें वर्गीकरण करून त्याचा कांहीतरी मेळ लावणे अवश्य होतें. वारसा वगैरे अनेक हक्कासबधाने निरनिराळ्या रूढी काय आहेत

तें पाहून कांहीतरी निश्चित नियम तयार करावयाचे होते. इनाम कमिशनचें काम करीत असतांना गोपाळरावांना अशा प्रकारच्या कामाचा बराच अनुभव आला होता. ती गोष्ट लक्षांत घेऊन सरकारनें या कामावर त्यांची नेमणूक केली. त्यावेळी तयार झालेल्या Digest च्या पुस्तकापैकी बराचसा भाग यांच्या परिश्रमानें व त्यांच्या देखरेखेखाली तयार झालेला आहे व त्यातल्यात्यात पुस्तकाच्या शेवटी जोडलेलें वारसा वगैरे हक्कासबधी विवेचन असलेले परिशिष्ट याचे आहे, अशी माहिती त्याचे चिरजीवांकडून मिळते.

गोपाळरावांची नोकरीही फार दिवस टिकली नाही. काम लवकरच सपले व काही दिवस गोपाळराव घरीच होते. पण त्याची झालेली नोकरी लक्षात घेऊन सरकार त्याची कोठे तरी सोय लावण्याची सधी पाहात होते व ती लवकर आलीही.

१८५८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यांत एक कलम असे होतें की. लायक माणूस मिळाल्यास गोरा काळा हा भेद मनात न आणता सरकार त्याच्या योग्यतेप्रमाणे व लायकीप्रमाणें कोणत्याही जागी त्याची नेमणूक करील. या कलमाला अनुसरून सन १८६२ साली, गोपाळरावांची नेमणूक Civil Service मध्ये करावी, अशी शिफारस मुबईसरकारने सेक्रेटरी ऑफ स्टेट यांचेकडे केली व त्यांस अहमदाबाद येथे असिस्टट जज्ज नेमिले आमच्या व मुबई सरकारच्या दुर्दैवाने येथील गोरे सिव्हिलिअन या नेमणुकीविरुद्ध गिल्ला करू लागले व त्या चळवळीचा सेक्रेटरी ऑफ स्टेट याचे मनावर परिणाम होऊन गोपाळरावांच्या सिव्हिल सर्व्हिसमधील नेमणुकीस त्याची मजुरी मिळाली नाही. तरी पण मुबईसरकारने पगार वगैरे बाबतीत आपलें म्हणणें कायम ठेवून गोपाळरावांस १८६५ च्या ऑगस्ट महिन्यांत ॲक्टिग

जज्ज नेमले. काही दिवस मुबई येथें स्मॉलकॉज कोडतात काम केल्या-वर गोपाळराव अहमदाबाद येथें स्मॉलकॉज कोर्टाचे कायम जज्ज झाले. १८६७ सालपासून १८७६ पर्यंत म्हणजे जवळ जवळ १० वर्षे ते तेथेंच होते

या दहा वर्षात एकाच ठिकाणी वास्तव्य झाल्यामुळें गोपाळरावाच्या ओळखी वगैरे अहमदाबादेस पुष्कळ मोठमोठ्या लोकाशी झाल्या, व निस्पृहपणा, परोपकारीपणा इत्यादि आगच्या अनेक गुणामुळें त्याचे वजनही बसले. त्याचप्रमाणे वरचेवर बदल्या वगैरे झाल्या म्हणजे जम कोठेंच बसत नाही, कोणत्याही कामात लक्ष लागत नाही व जी थोडीफार फुरसत सापडते ती फुरसत गप्पा मारण्यात किंवा केवळ खेळात जाते, अशी आज पुष्कळशा सरकारी अधिकाऱ्याची स्थिती आहे. आपले काम सांभाळून फुरसतीच्या वेळी लोकाच्या उपयोगी पडावे अशी हौस पुष्कळाना निदान तरुणपणी तरी वाटत असते, तिचा उपयोग होत नाही. अशी स्थिती गोपाळरावाची झाली नाही, हें महाराष्ट्रांतील व गुजराथेंतील लोकाचे सुदैवच समजावयाचे अहमदाबाद शहरात त्याच्या प्रोत्साहनाने व सल्ल्यानें लवकरच अनेक लोकोपयोगी सस्था व चळवळी स्थापन झाल्या. याशिवाय आपल्या खाजगी किंवा सार्वजनीक कामासाठी कोणीही व कसाही माणूस त्याच्याकडे जावो त्याचे म्हणणे ऐकून घेऊन त्याला सल्लामसलत देण्यास गोपाळराव नेहमी तत्पर असत.सरकारी कामें व दररोजचा प्रपचव्यवसाय सभाळून या इतक्या गोष्टीत त्याना कसें लक्ष घालता येत असे याचे आश्चर्य वाटतें. परतु रिकामपणामुळे फुरसत नाही, या वर्गातले गोपाळराव नव्हते. दररोजच्या नित्यक्रमाचा त्याचा व्यवसाय दाडगा असला तरी तो ठरावीक व नियमबद्धही होता. त्यामुळें इतके सगळे उद्योग सभाळून लेखन-वाचनाकरितां वेळ सांपडे तो निराळाच. हें

नीटसें समजण्याकरिता त्यांची रोजची दिनचर्या काय होती, त्यांची व कुटुंबाची राहणी काय होती हे आता सांगतो.

* ते रोज प्रातःकाळी उठल्यावर शुचिर्भूत होऊन प्रातःस्मरणाचे श्लोक म्हणत नंतर मुंज झालेल्या मुलांकडून रुद्र, सौर, पवमान, पूजा, संध्या वगैरे ब्राह्मणाचें नित्यकर्म करावयास लावीत नंतर बाहेर फिरावयास निघत. त्यावेळी पांचचार बाहेरची मंडळीही असावयाचीच या मंडळीबरोबर बहुधा सामाजीक विषयाची चर्चा त्या वेळीं चालत असे. फिरून आल्यावर कोणी भेटावयास वगैरे येत, त्यांची गांठ घेऊन कोणाचे काय म्हणणें आहे, तें सर्व शांतपणे ऐकून घेत. कोणी याचक, भिक्षुक, कोणी गाऱ्हाणीं घेऊन आलेले, कोणी औषधपाण्याकरिता, असे अनेक प्रकारचे लोक त्यांच्याकडे येत, त्या सर्वांशी ते सारख्या प्रेमळपणाने वागत व आपल्याकडून होईल तेवढे सहाय्यही करीत मराठी पत्रव्यवहार, वर्तमानपत्राकरिता वगैरे लेखलेखन, कदाचित् ग्रंथलेखनाचे कामही, यातच सवडीप्रमाणे चालत असे.

* गोपाळराव स्नान थंड पाण्याने करीत. घरी असतील तीं मुलेंबाळें घेऊन साबरमती नदीवर स्नानास जावें, जातायेतां वाटेत, गरीब, आजारी, पंगू वगैरे कोणी भेटले तर त्यांना धर्म करावा, स्नान झाल्यावर मोठ्याने मुलांसकट ब्रह्मकर्म करावें व नंतर देवदर्शन घेत घरी यावें हा नित्यक्रम असे घरी आल्यावर पार्थिवाची पूजा करून अतिथी अभ्यागतासह ते भोजन करीत

* भोजनाचे वेळीं गप्पागोष्टी, विशेषतः ऐतिहासीक गोष्टी ते नेहमी सांगत पेशवाई जेवणाचा थाट वगैरेंचें मोठ्या रसभरीत रीतीचें वर्णन करीत, ते इतके की, ऐकणारांची हसतां हसतां मुरकुंडी वळत असे.

* भोजनानंतर थोडेंसें लेखन वगैरे करून ते कचेरीस जात. कचेरी

नंतर कथाकीर्तन, सभा-व्याख्याने वगैरे कांही असेल तर तिकडे जात किंवा फिरावयास जात. घरी आल्यानंतर मुलाकडून रामरक्षा वगैरे स्तोत्रे म्हणून घेत व मग जेवीत.

*एकंदरीत त्यांची घरची व लोकांतील वागणूक साधी असे. भेटावयास कोणी केव्हांही येवो, त्यांचा दरवाजा नेहमी मोकळा. पुष्कळ लोक येऊन आपली लहान लहान गाऱ्हाणी देखील अशी सांगत बसत, की ऐकणारा असेल त्याला मनस्वी कंटाळा यावा पण गोपाळराव कोणाचे म्हणणे ऐकून कंटाळले असे कधी झालेच नाही. मात्र केव्हांही कोणाही जावा ते रिकामे असे दिसावयाचे नाहीत. जवळ कांहीतरी वर्तमानपत्र पुस्तक वगैरे पडलेले असे व फुरसतीप्रमाणे त्यांचे वाचन सतत सुरू असे त्यांचा पोशाखही साधा व बालबोध वळणाचा असे अंगरखा, पागोटे, धोतरजोडा ही सर्व साधी असावयाची. व या पोशाखाच्या रीतीत त्यांनी कधीही बदल केला नाही. पुढे पेन्शन वगैरे घेतल्यानंतर ते घरी सोप्यात बसले असताना गोष्टी निघून त्यांना कोणी विचारिले की, दिल्लीदरबाला ( १८७७ साली ) गेला होता त्यावेळी पोशाख कसा केला होता? शेजारी असलेल्या खुंटीवरचे उपरणे ओढून अंगावर घेऊन ते म्हणाले, " हा असा " अशी एक त्यांची गोष्ट सांगतात यावरून त्यांच्या साध्या राहणीची थोडीशी कल्पना येईल

या दिनचर्येची टिपणे गोपाळरावजींचे मित्र बळवंत मनोहर पंडित यांनी केली आहेत, त्यांपैकी एक खाली देतो.

*" मला अहमदाबाद येथे असतांना जो त्यांचा सहवास घडला त्यावरून माझ्या मनाची अशी खात्री झाली आहे की, गोपाळराव हे श्रीमाणिकप्रभू यांच्यासारखे सकलमतस्थापक होते. ते वैष्णवाबरोबर वैष्णव, शैवाबरोबर शैव असे होते. त्यांची वास्तवीक उपासना

कोणती तें कोणासच सागतां येणार नाही. उपनिषदे व वेदान्त यात ते प्रवीण होते. तथापी ते वेदान्ती नव्हते. वेदांत्याप्रमाणें त्याची दृष्टी ससाराविषयी उदास मात्र झालेली नव्हती -प्रत्येक खऱ्या वेदात्याची दृष्टी नेहमी उदासच असते का उदासपणाचे वरून सोंग आणि आंतून मैदवृत्ती असा प्रकार असतो कोणास ठाऊक ? -प्रत्येक मतवाद्यास असे वाटतें की, गोपाळराव हे माझ्या मताचे आहेत. मात्र ते स्वत. रात्रौ निजण्यापूर्वी एकातात जप करीत असत पहाटे पच-पच उष:काली उठून प्रात:स्मरण करीत या सर्व गोष्टी अहमदाबादेस असताना मी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. कारण हपीसाच्यावर लायब्ररी-जवळ त्याचे निद्रास्थान असे. व जवळच लायब्ररीचे दिवाणखान्यात मला एक पलगडी टाकून दिली होती तेथे मी निजत होतो

अहमदाबाद येथील दहा वर्षाच्या अवधीत ग्रामण्याचे प्रसग गोपाळरावजीवर दोनदा आले त्याचप्रमाणे त्याचेपूर्वी काही वर्षे पुण्यातही त्याजवर असा प्रसग आला होता त्यावेळचे सामाजीक सुधारणेचे प्रश्न कोणते, त्याजकडे बघण्याची ता कालीन पिढीची दृष्टी कशी असे हे वाचकाना कळावे, म्हणून या दोन प्रकरणासबधाने विस्तारानें लिहितो पहिले, पुण्याचे प्रकरण अगदी क्षुल्लक कारणावरून निघाले होतें गोपाळराव वर्तमानपत्रातून भट-ब्राह्मणाच्या चालीरीतीसबधाने कडक पत्रे लिहीत, हा त्याचा क्रम सन १८४८ पासून सुरू होता त्यावेळच्या शिकलेल्या ब्राह्मण मडळीत ते एकटेच अशा मताचे होते असें नाही. कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा० ब० आण्णासाहेब भिडे, सोन्याबापू माडे ही सर्व मडळी त्यावेळी सुधारणेच्या मताला अनुकूल होती. व त्याप्रमाणे त्याची वागणूकही असे. गोपाळरावजीत जे विशेष होतें तें एवढेंच की, ते वर्तमानपत्रातून उघडपणे जुन्या चालीरीतीची चर्चा करीत व

विशेष स्पष्टपणें लिहीत. सन १८६० सालच्या सुमारास जुनी संस्कृत पाठशाळा बंद होऊन इंग्रजी शिक्षण देणारें एक हायस्कूल व एक कॉलेज अशा दोन संस्था चालाव्या असे सरकारने ठरविले, त्यावेळी दक्षिणाफंडाची काय व्यवस्था करावी यासंबंधात पुण्यातील गोपाळराव प्रभृती सात मंडळींनी गव्हर्नरसाहेब यांचेकडे एक अर्ज करून अशी विनंती केली की, शास्त्री पुराणीक वगैरे मंडळींना उत्तेजन देण्याकरिता इतःपर खर्च न करिता देशी भाषांतून उपयोगी पुस्तकें लिहवून घेण्याकडे या रकमेचा विनियोग करावा संस्कृत विद्या, निदान वैदीक पुराणीक ज्या प्रकारच्या विद्येला मान देतात तशा प्रकारची विद्या निरुपयोगी आहे अशा अर्थाचा मजकूर या अर्जात होता

यावरून ग्रामण्याच्या चळवळीला सुरवात झाली. तुळशीबागेत शहरातील सकळ ब्रह्मवृंदाची सभा भरून असे ठरले की, गोपाळराव प्रभृती अर्जदार मंडळींना बोलावून त्यांचे म्हणणे ऐकून घ्यावें व त्याजवर वेदपुराणाची निंदा केली म्हणून पतितत्वाचा आरोप ठेवून त्याम बहिष्कृत करावें पुढे गोपाळराव सभेस गेले असता जमलेल्या मंडळींनी गिल्ला करून 'आमचा अर्ज परत द्यावा' अशा मजकुराच्या एका नवीन अर्जावर त्यांची व इतर मंडळींच्या सह्या घेतल्या सभा संपताच गोपाळराव घरी आले व दुसऱ्या अर्जावर आमच्या सह्या सक्तीने घेतल्या आहेत आमची मते बदलली नाहीत, आमचे मत पूर्वीप्रमाणेच अजूनही कायमच आहे, अशा अर्थाचा तिसरा एक अर्ज त्यांनी गव्हर्नरसाहेबाकडे पाठवला. पण दुसरा व तिसरा हे अर्ज जाण्यापूर्वीच दक्षिणाफंडाचा विनियोग काय करावा याचा निकाल सरकारात झाला होता. तो असा की, इंग्रजी शिक्षण देणाऱ्या कॉलेजात या फंडातून शिष्यवृत्त्या ( fellowships ) द्याव्यात. व इतर विद्वान् मंडळींकडून देशी भाषांतून पुस्तकें लिहवून घेऊन त्यास

बक्षिसें द्यावीत. पुराणाभिमानी मंडळी पुन्हां खवळली व ग्रामण्यानें पुन्हा डोकें वर काढलें पुन्हा सभा झाली, तींत वे०शा०स० वैजापूरकर शास्त्री यांनी या मंडळीवर वेदनिंदा केल्याचा आरोप करून आपली कैफियत वाचण्यास सुरवात केली परंतु याच सभेत बरीच शिकलेली व नव्या मताची मंडळी हजर होती असें दिसतें. कारण शास्त्रीबुवा अर्ज वाचीत असतां मध्येच कोणीतरी दिवे मालविले व सभेत गोंधळ होऊन सभा मोडली. पुण्यास पुन्हा या प्रकरणीं सभा झाली नाही. सभेत दंगा करण्याबद्दल पुणे येथील नव्या जुन्या तरुणाचा लौकीक त्या-वेळेपासून आहे असे दिसतें.

अहमदाबादच्या ग्रामण्याचा विषय पुनर्विवाह हा होता. विधवा-च्या दु:स्थितीबद्दल चळवळ, निदान वर्तमान पत्रांतून वगैरे विचार व लेखन, सुरू होऊन त्यावेळीही जवळ जवळ ३० वर्षे झाली होती पुण्यास जाहीर रीतीनें पुनर्विवाहाचा पुरस्कार करणारे गृहस्थ रा० विष्णूशास्त्री बापट या नावाचे होते. पुढे विष्णू परशराम रानडे, विष्णूशास्त्री पंडित, कृष्णशास्त्री, गोपाळराव देशमूख, भांडारकर, रानडे, ही सर्वच मंडळी या मताचा पुरस्कार करू लागली त्याचप्रमाणे मुंबई, गुजराथ या बाजूकडेही शिकलेल्या मंडळींत पुनर्विवाहमताचा पुरस्कार होत होताच. या मंडळींच्या व विशेषत: बंगाल्यांतील ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या नेटाच्या खटपटीला यश येऊन अखेरीस विधवा विवाहाचा कायदा २५ जुलै १८५६ या दिवशीं हिंदुस्थान सरकाराने पास केला. परंतु प्रत्यक्ष कृती घडून येऊं लागण्यास काही वर्षे वाट पहावी लागली. सन १८६९ साली पुनर्विवाहाला अनुकूल असलेल्या मंडळी-नी एक पुनर्विवाह घडवून आणिला व त्या निमित्ताने, खरोखर किती मंडळी अनुकूल प्रतिकूल आहेत, याची परीक्षा पाहण्याकरितां एक पत्र तयार करून तें निरनिराळ्या ठिकाणच्या पुढारी लोकांस

लिहिलें या पत्रावर सह्या करणाऱ्या मंडळींत गोपाळराव होते. हा विवाह मुंबईस Grant Road च्या बाजूस गवळी तलावाजवळ झाला. त्यावेळीं ठिकठिकाणची मंडळी मुद्दाम विवाहाकरितां व भोजनसमारंभाकरितां हजर होती. यावरून ग्रामण्याला सुरवात झाली. पुण्यातील वे०शा० स० गणेशशास्त्री मालवणकर यांचेकडे या प्रकरणांतील पुढाकार असून त्यांची ठिकठिकाणीं पत्रें जाऊन ब्राह्मणांच्या सभा भरू लागल्या व आपल्या गांवीं अगर प्रांतांत ज्यांनीं सह्या केल्या होत्या त्यांजवर बहिष्कार पुकारला जाऊं लागला. वाई, नाशीक, अहमदाबाद, बडोदें, खुद्द मुंबई इत्यादी ठिकाणीं सभा भरल्या व त्यांनीं बहिष्कार पुकारला. त्या बहिष्कृत मंडळींत गोपाळरावाचें नांव होतें. कांहीं ठिकाणीं कांहीं समंजस ब्राह्मणमंडळी होती तेथें बहिष्कारवाद्यांची आलेलीं पत्रें पुढारी वैदिकांनीं दाबून ठेवून गांवांत चळवळ पेटूं दिली नाहीं. 'ऐतिहासिक गोष्टी' या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत अशा एका ठिकाणची माहिती दिली आहे. ती अशी—मुंबईस प्रथम पुनर्विवाह झाला तेव्हां भटांनीं आपले रोजगार पिकविण्याकरितां जिकडे तिकडे ग्रामण्यें उभीं केलीं. या लोभी व दुष्ट भटांनीं दूर दूरपर्यंत डाका पाठविल्या व थोतांडें उभीं केलीं, परंतु ठाणें येथें ब्राह्मणांत प्रमुख भिकोबा जोशी (साष्टीकर) म्हणून आहेत त्यांनीं आपले गांवीं पत्रें आलीं तीं तशींच बांधून ठेऊन ग्रामण्य म्हणून होऊं दिलें नाहीं व स्वस्थतेनें व्यवहार चालविले. असें हें एकच गांव सर्व हिंदुस्थानांत आढळलें. याजवरून सूज्ञ लोक जेथें आहेत तेथें मूर्खांनीं कसेंही व कितीही दुष्ट उद्योग केले तरी बडाळी उत्पन्न होत नाहीं. त्याप्रमाणें इतर एकदोन ठिकाणीं समजूतदार पुढारी मिळाले. त्यांतल्यात्यांत अहमदाबादेस असलेल्या गुजराथी व दाक्षिणी ब्राह्मण मंडळीची गोपाळरावावर फारच भक्ती होती. व निमंत्रणपत्रावर त्यांची सही असली तरी कामाच्या अडचणीमुळें

विवाहप्रसंगी ते प्रत्यक्ष हजर नव्हते त्यामुळें त्याजवर बहिष्कार घालणे त्यानी नाकारिलें इतकेंच नाही तर बडोद्यास त्यांच्यावर बहिष्कार पुकारून तेथील ब्राह्मणानी सरदार मुजुमदार ( गोपाळरावाचे जामात ) यास त्यात गुतविलें होतें व मुलीचें माहेरसासर बद करविले होते; त्याबद्दल रदबदली करून तेथील बहिष्कारही रद्द करविला. बडोद्याच्या या फेर ठरावाला पुढें शकराचार्यांची समती मिळून गोपाळरावजीच्या मागला हा बहिष्कार सुटला. त्याचवेळी, ते विवाहप्रसगीं हजर राहिले नाहीत याबद्दल त्याच्या मित्रमडळींचाही त्याच्यावर रोष झाला व कित्येकानी हे बोलावयास तेवढे शूर अशी त्याच्यावर टीकाही केली या टीकेत तथ्य किती होते हें कळण्याला आज मार्ग नाही परतु येवढी गोष्ट खरी की, गोपाळरावाची मते तशीच कायम होती, व वेळ प्रसग आला असता ती ते उघडपणे बोलून दाखवीत या बहिष्कारप्रकरणाच्या दिवसात पुनर्विवाहाला अनुकूल असलेले श्रुतिस्मृतींचे आधार पुढे करून व पुनर्विवाहपक्षाच्या म्हणण्यांत शास्त्राधार बाजूला ठेवला तरी व्यवहाराचा व युक्तीचा जेवढा भाग आहे त्याचे त्यानी आधारानें प्रतिपक्षी यास तीस प्रश्न टाकिले आहेत त्याची उत्तरे देण्याविषयी त्यास आव्हान केलें आहे.

हे एक बहिष्कारप्रकरण सपते न सपते तोंच गोपाळरावजीवर आणखी एक प्रकरण उपस्थीत झालें. ते असे. त्याचे चिरजीव कृष्णराव येथे बी ए ची परीक्षा पास होऊन व सरकारी शिष्यवृत्ती मिळवून पुढील शिक्षणाकरीता विलायतेस गेले व तेथे तीन वर्षे राहून बॅरिस्टर होऊन परत आले. कोकणस्थ ब्राह्मण जातीतले हे पाहिले बॅरिस्टर होत, यास भेटण्याकरिता गोपाळरावजी मुबईस गेले होते. कृष्णराव अहमदाबादेस पोचल्यावर तेथें ते गोपाळरावांपासून वेगळे राहात असत, कारण आपल्यामुळे घरच्या इतर मडळीस त्रास होऊ

नये. पण ते गोपाळरावाचे चिरंजीव, तेव्हा संसर्गदोष तरी झाला असेलच अशी शंका कोणी काढली व ग्रामण्य पुन्हा रंगले. नौकागमन दोषार्ह आहे की नाही हा वादाचा मुख्य मुद्दा होता. त्या प्रकरणी, याच्या आधीच दोन चार वर्षे होळकर सरकार यांनी आपले एक ब्राह्मण वकील विलायतेस पाठविले होते त्या वेळी शंकराचार्यांपर्यंत जाऊन व निरनिराळ्या क्षेत्रातील ब्राह्मणाचे मत घेऊन परवानगी आणविलेली होती. त्या वेळी धर्मगुरूनी दिलेल्या निकालातील महत्त्वाचा मुद्दा असा होता की.—हल्ली बदललेल्या काळात परदेशगमन ही बाब रोजच्या व्यवहारात आलेली आहे. शिवाय देशातल्या देशात तरी नौकागमनाचे प्रसंग वरचेवर पुष्कळाना येतात त्या वेळी कोणी ग्रामण्य करीत नाही. कोकणातून ब्राह्मण मुंबईस येतात त्या वेळी कोणी बहिष्कार घालीत नाही तेव्हा रूढी व युक्ती या दोन्ही गोष्टींचा विचार करून बहिष्कार आवश्यक नाही तरी पण व्यवहारात सुनालेकींच्या माहेरसासर इत्यादी दररोजच्या गोष्टीत त्रास होऊ लागला, त्याला गोपाळरावजी कंटाळले शेवटी काशीहून ब्राह्मणाकडून शुद्धीपत्र आणविले तेव्हां ही भानगड मिटली. पुढील वर्षी पार्लमेंटरी कमिटी हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीची चौकशी करण्याकरितां नेमिली होती तिजपुढे साक्ष देण्याकरिता गोपाळरावाना सरकारने बोलाविले होते. पण या त्रासाला कंटाळून गोपाळराव गेले नाहीत.

अहमदाबादच्या या एकंदर दहा वर्षांच्या अवधीत गोपाळरावाचा बडोदें संस्थानाशी संबंध निरनिराळ्या प्रकारांनी आला ते असिस्टंट जज्ज असताना अगदी आरंभीच्या दिवसात खंडेरावमहाराज अहमदाबादेस आले होते त्या वेळी त्यांचेबरोबर रेसीडेन्सीतील गोरे

अधिकारी लेफ्टेनंट फिनिक्साहेब व अहमदाबादचे सिव्हिलिअन युरोपियन अधिकारी यांचेमध्ये बेबनाव होऊन भानगड उपस्थीत झाली होती. व त्या वेळीं गोपाळरावही आपल्या सहकारी अधि-काऱ्याबरोबर तीत गुतलेले होते. गोपाळरावासारखा सच्छील माणूस विनाकारण गुतला याबद्दल खडेराव महाराजांना मनापासून वाईट वाटत होते पुढें सुयोगाने खडेराव व गोपाळराव याची गाठ पडून महाराजाचा लोभ गोपाळरावावर जडला, व ते कारभारात पुष्कळ वेळां गोपाळरावाची मसलतही घेत त्याचप्रमाणे खडेराव व जमनाबाई या गुणी दपत्याबद्दल गोपाळरावानाही मोठा आदर वाटत असे ते बडोद्यास वरचेवर जात व महाराजाचा पाहुणचार घेत. पुढे खडेराव कैलासवासी झाले व जमनाबाई पुण्यास अज्ञातवासात येऊन राहिल्या, आणि मल्हाररावांचा गायकवाडी कारभार बडोद्यास चालू झाला. त्यासबधाने ‘ हितेच्छू ’ पत्रात जोरदार लेख लिहून त्यानी ही सर्व अदाधुदी बाहेर काढली. त्याची बातमी नेहमी खरी पारखून घेतलेली असे व तिचा त्याना उपयोग झाला हे सागणें नको ‘ ऐतिहासिक गोष्टी ’ या पुस्तकाच्या पहिल्या भागात १९७।१९८।१९९ ही टिपणे बडोदे संस्थानच्या या काही वर्षांच्या कारकीर्दीसबधाने लिहिली आहेत ती वाचकानी पाहावींत म्हणजे त्याच्या बातमीचा बिनचूकपणा व व्यापकपणा किती असे हे वाचकाना दिसेल “ यानी ( खूषमस्कऱ्यानी ) पाच वर्षे गोधळ घातला. परतु एकाचे हातूनही घडगत झाली नाही ” हा गोपाळरावानी दिलेला अभिप्राय अगदी मार्मीक आहे. या बेबदशाहीचा शेवट झाल्यावर जमनाबाई राणीसाहेबाची आपल्याला दत्तक व्हावा ही खटपट चालू झाली. त्या कामी जुनीं कागदपत्रे, तहनामे वगैरे चाळून बाईला मसलत देण्याचे काम गोपाळ-रावांनी केलें व त्याचे चिरजीव बॅरिस्टर कृष्णराव यांनी अर्जाचा

अखेरचा मसुदा करून पाठविला या सर्व खटपटीला यश येऊन शेवटी दत्तक कायम झाला.

गरीब श्रीमत हा भेद गोपाळरावानी कधी लक्षात आणला नाही. गरीब व विपत्तीत पडलेल्या, दुबळ्या व म्हणूनच फसलेल्या अशा अनेक लोकाची गाऱ्हाणी त्याच्या कानापर्यंत येत, व त्यात तथ्य आहे असे आढळले तर पैसा-अडका. वकील, सल्लामसलत अशा कोणत्या ना कोणत्या तरी प्रकाराने ते त्याची सोय लावीत अशी काही उदाहरणें त्याच्या घरच्या पत्रात टिपलेली सापडतात पण विस्तार वाढतो म्हणून ती येथे दिली नाहीत या सर्व अवधीत दक्षिणेकडील पुणे सातारा इकडल्या चळवळीकडे गोपाळरावाचे लक्ष नेहमी असे इकडचे कित्येक जुने स्नेही त्याना खाजगी कामात सल्लामसलत विचारीत व ती अशी त्याजकडून मिळतही असे श्री० विचूरकर, अक्कलकोटचे भोसले, वाईचे शेखमिरे सरदार वगैरे घराण्यातील खाजगी तटेभाडणे व सरकारी काम यात कित्येकवेळा त्याच्या मसलतीचा उपयोग झाला आहे असे दिसते

अहमदाबाद येथे प्रेमाभाई इन्स्टिटयूट नावाची एक सस्था आहे तिच्यामार्फत दरवर्षी व्याख्याने होत असतात. गोपाळरावाची या ठिकाणी अनेक विषयावर व्याख्याने झालेली आहेत. त्याचप्रमाणे तेथे गुजराथी–इग्रजी असे “ हितेच्छू ” नावाचे वर्तमानपत्र गोपाळरावाच्या प्रेरणेनेच निघाले व ते कित्येक वर्षेपर्यंत त्यात स्वत लेखही लिहीत. विशेषत. बडोद्यास मल्हाररावी चालू असताना तिच्याविरुद्ध तेथे कोणाची ब्रही काढण्याची छाती नव्हती. पण तेथून प्रत्येक जुलमी कृत्याची इत्थभूत हकीगत गोपाळरावजीस कळे, व त्या माहितीच्या आधाराने मल्हाररावाच्या जुलुमावर ते कडक टीका करीत, वगैरे हकीगत वर आलीच आहे गुजराथ व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन

सोसायटीच्या कामात ते विशेष लक्ष घालीत, व सागण्यासारखी गोष्ट म्हणजे ते गुजराथीत ग्रथरचनाही करीत असत अनेक शास्त्र-ग्रथाचे अवलोकन करून, व निरनिराळे आधार, प्रमाणे, याचे विवेचन करून त्यानी गुजराथीत " आगमप्रकाश " व " निगमप्रकाश " असे दोन ग्रथ लिहिले. याची मराठी रूपातरेही त्यानीच केली आहेत. या पुस्तकातून वेदवेदागे यानी सागितलेल्या विहीत मार्गाचें व त्याचप्रमाणे मत्रतत्र, शक्तिमार्ग इत्यादी वाममार्गाचे वर्णन व विवेचन आहे या ग्रथाचा उल्लेख, पुढे योग्य ठिकाणी पुनः येईलच

गोपाळरावजीची अहमदाबाद येथील नोकरी, व्यवसाय याची ही हकीगत थोडक्यात दिली आहे याखेरीज त्याच्या खासगी अशा पुष्कळच लहान लहान गोष्टी सागण्यासारख्या आहेत. परोपकार हा त्याचा देहस्वभावच बनला होता, तेव्हा या गोष्टी, बहुतेक परोपकाराच्याच असावयाच्या व आहेतही त्या सागावयाला जागा नाही, याला नाइलाज आहे.

गोपाळरावाची बदली अहमदाबादेहून नाशकास सन १८७६ साली झाली. त्यावेळी तेथील लोकाकडून त्याचा मोठा सत्कार झाला. जाणाऱ्या येणाऱ्या—त्यातूनही विशेषत येणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याला मेजवान्या, पानसुपाऱ्या, मानपत्र वगैरे नेहमी थोडी फार मिळतातच. परतु गोपाळरावजीच्या बाबतीत असा वरकरणी प्रकार नव्हता त्याचा निस्पृहपणा, व लोकोपयोगी कामाविषयी कळकळ या गुणामुळे ते लोकाना खरोखरच प्रिय झालेले होते, व त्यामुळे त्यांच्या जाण्याचे त्याना मनापासून वाईट वाटले. त्यातल्यात्यात ते बढतीच्या जागेवर जात होते एवढाच लोकाना सतोष होता.

गोपाळरावजीच्या मृत्यूनतर पुण्यास जी दु:खवट्याची सभा झाली त्या सभेपुढें भाषण करताना रा० ब० लालशकर उमियाशकर यानी

विशेषत. त्याच्या अहमदाबाद येथील कामगिरीचा उल्लेख करून तिजविषयी काढलेले उद्गार अतिशय महत्त्वाचे आहेत, ते येथें देऊन हे बरेच लाबलेले अहमदाबाद प्रकरण पुरे करतो

"रा० ब० देशमुखास अहमदाबाद व एकदर गुजराथ ह्या प्रातात देवतुल्य समजतात व अशी तिकडे सर्वांची समजूत होण्यास त्याची तशी वृत्ती व वर्तन ही कारण झाली आहेत देशमुख हे अहमदाबादेस १२ वर्षे होते ते अहमदाबादेस आले तेव्हा तेथे कोणत्याही प्रकारच्या सुधारणामताचे नावही नव्हते. मग तत्सबधाच्या सस्थाची गोष्ट कशाला विचारता ? परतु देशमूखसाहेब आल्यापासून अहमदाबादेस ह्या काळाला उचित त्या सर्व सुधारणामताच्या सस्था स्थापन होऊन अहमदाबाद शहरचें युग बदललें असे म्हटले तरी चालेल तेथे सर्व सुधारणामताचे विचार सुरू होऊन समाजाचे पाऊल पुढे पडत चालले. अहमदाबादच्या अनेक सस्थाशी सरदार देशमुख हे प्रत्यक्ष सबद्ध होते त्याची अहमदाबादेहून नाशिकास बढतीवर बदली होऊन ते तिकडे जाण्यास निघाले तेव्हा अहमदाबादच्या एकदर आबालवृद्धास अत्यत दुःख झालें. सर्व शाळातील मुले एकत्र जमून त्यानी रावबहादुरावर जयजयकारपूर्वक पुष्पवृष्टि केली त्याच्याविषयी सर्वांना प्रेमादरभाव असल्यामुळे त्याचा वियोग सर्वास दुःसह झाला त्याच्या यादगिरीचा एक स्वतत्र फड उभारून त्या व्याजातून देशी कामगिरीला उत्तेजनादाखल बक्षिसें वगैरे देण्याकडे व्यय करण्यात येतो."

पुढील ३।४ वर्षांत गोपाळरावजींची नोकरी नाशीक, नगर, ठाणे येथे—मुख्यत्वेकरून नाशीक येथेंच—झाली यावेळी नाशकास सरकारी नोकरीतले वरच्या प्रतीचे अधिकारी सर्व सुधारणावादी असे एकत्र येण्याचा सुयोग आला होता असे म्हटलें पाहिजे. रा० ब० आण्णासाहेब भिडे, महादेव गोविंद रानडे, गोपाळराव

देशमूख ही सर्व विद्याभिलाषी व्यासंगी व सुधारकाग्रणी मंडळी एकत्र जमली होती. अर्थातच नाशकास त्यावेळी यांच्या प्रोत्साहनानें लोकोपयोगी अनेक संस्था निघाल्या त्यातल्या त्यात दोन विशेष सांगण्यासारख्या म्हणजे एक वक्तृत्वोत्तेजक सभा व दुसरी अनाथ मुलांचे संरक्षण करण्याकरिता एक संस्था या होत नाशीकसारख्या क्षेत्रात, चुकून वाकडे पाऊल पडल्यामुळे, गुप्तरीतीने प्रसूतीकरिता येणाऱ्या उच्च पांढरपेशा वर्गातील, व विशेषत ब्राह्मणजातीतील विधवांची संख्या मोठी असते—निदान त्यावेळी ती असे, यात शंका नाही. व अशानी प्रसूतीनंतर मुकाट्याने वाळवंटात नदीतीरी टाकून दिलेली लहान अर्भके नेहमीच सांपडत वाई, पंढरपूर इत्यादी क्षेत्रांच्या इतर ठिकाणीही असाच प्रकार होता, व थोड्याशा कमी प्रमाणात असेल, पण आजही आहे ही शोचनीय स्थिती दूर करण्याकरिता एक बालहत्याप्रतिबंधकगृह काढून त्या ठिकाणी अशा नडलेल्या बायकांच्या प्रसूतीची सोय करावी या हेतूने या मंडळींनी नाशीक येथे खटपट करून एक संस्था स्थापन केली

वक्तृत्वोत्तेजक सभेची हकीगत ही अशीच आहे रानडे, देशमूख ही मंडळी सभेला नेहमी हजर असावयाची, बोलावयाची, इतर मंडळींना, विशेषत· तरुण होतकरू मंडळींना बोलण्याचे उत्तेजन द्यावे व कोणी वेडेवाकडे कसेही बोलो, त्याला सभाळून घ्यावे असा त्यांचा क्रम असे त्यामुळे सभांना व व्याख्यानांना पुष्कळ मंडळी जमत व वादविवादांना रंग येई. गोपाळरावजीकडे या दिवसात शाळेतील तरुण मुले जमण्याचा एक अड्डाच असे. कारण त्यांना तरुण मुलांच्या सहवासाची हौस फार या जमणाऱ्या तरुण मंडळीत टिळक ( कै० ना. वा. टिळक ), खरे, (रा० ब० गणेश नारायण खरे,) रिटायर्ड डे. ए. इन्स्पेक्टर, व रानडे—( कै० वामन बाळकृष्ण रानडे

ज्ञानचक्षु पत्राचे माजी संपादक ) वगैरे मंडळी असत यांच्यापैकी वामन ( राव ) रानडे हे तरुण गृहस्थ, फार चौकस, व सभोंवती काय चाललें आहे याचें मार्मिकपणानें निरीक्षण करणारे असे होते. त्यांची पुढील ७।८ वर्षे गोपाळरावजींच्या घरींच कारकुनींत गेलीं व इतर गृहस्थांच्या पुष्कळ बोधप्रद व मनोरंजक गोष्टी त्यांना प्रत्यक्ष पहावयाला सांपडल्या. वामनराव हे गरीब, आणि अविवाहीत होते. व त्यांच्याशीं हितगूज सांगण्याजोगें प्रेमळ माणूसही कोणी नव्हतें. पण मनांत विचारविकारांची खळबळ फार, ती कुठें तरी विचाराला वाव मिळाल्याखेरीज चैन पडूं देत नसे. यामुळे ते आपले मनचें गुपित लेखणी आणि कागदाची एक स्मरणवही याजपाशीं मोठ्या नियमितपणानें व कळकळीनें सांगत वामनरावजींच्या या ' स्मरणवह्या " त्यांचे घरीं आहेत व त्या त्यांचे चिरंजीवाकडून मला पहावयाला मिळाल्या होत्या त्यांत बारीकसारीक अशा पुष्कळच गोष्टींची टिपणें आहेत गोपाळरावजींच्या पुणें, ठाणें, मुंबई, येथील प्रवासांच्या तारखा, त्यांच्या चिरंजीवांची जाणीयेणी, सार्वजनीक महत्त्वाच्या प्रसंगाची टिपणें, वक्तृत्वोत्तेजक सभेतील वादविवादाचीं टिपणें, इत्यादी पुष्कळ माहिती—बरीचशी टिपणवजाच—पण कांहीं थोडी विस्तृतपणानें दिलेली आहे. तीवरून नाशीक येथील त्या चार वर्षांच्या घडामोडीची कल्पना थोडीशी करितां येते, व लोकहित-वादींच्या तत्कालीन चरित्रावर थोडासा प्रकाश पडतो.

या काळांत गोपाळरावांना सरकारी काम बरेंच असे. शिवाय कुटुंब मोठें, मुलें कर्ती होऊन संसाराला लागली होती व लागतही होती, त्यामुळें घरांत जाणाऱ्या-येणारांची, पै-पाहुण्यांची, वर्दळ फार फुरसतीनें लेखनाला वेळ मिळत नसे, व वयोमानाप्रमाणें पूर्वीइतकें कामही त्यांच्या हातून होत नसे. म्हणून वामनराव हे त्यांचें लेखनाचें

काम करीत. आश्वलायन गृह्यसूत्राचें भाषांतर, ऐतिहासिक गोष्टीचे तीन भाग ( हल्ली यांचा दोन भागांतच समावेश केला आहे.) पानपतची लढाई, गीतातत्त्व, हिदुस्थानच्या आर्थीक परिस्थितीवरील कित्येक लेख, व सभांतून निरनिराळ्या वेळी अनेक प्रकारच्या विषयावर दिलेली व्याख्यानें ही सर्व या काळची आहेत. मनात विचार आला की, तो व्यक्त कसा करावयाचा याची अडचण गोपाळरावजीना कधी वाटली नाही विचाराचा अकूर जोरदार असल्यामुळे व मनोभूमी पूर्वीच्या अनभवाने चागली तयार झालेली असल्यामुळे विचार स्पष्टपणें व जोरानें बाहेर फुटे जे जसें आठवेल तसें ते भराभर मोडीत लिहून काढावे व मग वामनरावानी त्याच्या सागण्याप्रमाणें दुरुस्त्या करून स्वच्छ बालबोध प्रत तयार करावी असा क्रम असे

नाशीक, ठाणे, अलीबाग, मुबई, इत्यादी ठिकाणी गोपाळरावजींच्या नोकरीची शेवटची चार वर्षे गेली असे वर सागितलेच आहे. या अवधीत सरकारकडून त्याना अनेक रीतींनी मान मिळाला सन १८७६ चे दिल्लीदरबारच्या प्रसगी त्यांना रावबहादूर हा किताब मिळाला, पुढील वर्षी ते जे. पी झाले, व त्याचे पुढील वर्षी मुबई विश्वविद्यालयाच्या सीनेटचे सभासद झाले. याच वर्षी वयाला ५५ वर्षे पुरी होऊन गेल्यामुळें पेन्शन घेऊन ते पुण्यास कायमचे घरी राहण्यास आले. या नतरची त्यांची पुढील १७।१८ वर्षे सार्वजनीक हिताच्या अनेक व्यवसायात व विशेषत: लेखनात गेली त्याना आता लिहिण्याला फुरसत जास्त सांपडे. तिचा कांही तरी उपयोग करावा म्हणून त्यानी पुण्यास आल्यानतर लवकरच "लोकहितवादी" या नावाचें स्वतत्र मासीक पुस्तक काढण्यास सुरवात केली व त्यातून राजस्थान, गुजराथ इत्यादि देशाचे इतिहास, पृथ्वीराज, दयानद यांची चरित्रें व हिदुस्थानच्या स्थानिक स्वराज्यासारखा प्रचलीत

राजकीय विषयावरील निबध अशी अनेक लहान मोठी पुस्तके छापून प्रसिद्ध केली त्याप्रमाणेच प्रभाकर, इदुप्रकाश, वृत्तवैभव वगैरे निरनिराळ्या पत्रातून लिहिलेले लेख व पत्रव्यवहार याचा सग्रह करून तो खडशः प्रसिद्ध करावयाची योजना त्यानी केली होती. त्याप्रमाणे एक खड बाहेर पडला. लोकास घेण्यास सुलभ पडावें म्हणून किमन खर्च भागेल इतकीच—म्हणजे मोठ्या साचाच्या शिळा छापावरील सुमारे ११०० पानाच्या पुस्तकास चार रुपये ठेविली व तीही नावाची होती कारण आपल्या मताचा प्रसार व्हावा म्हणून ते या पुस्तकाच्या प्रती फुकटही वाटीत त्याचप्रमाणे ब्राह्मणाना आपल्या नित्यकर्माची माहिती व्हावी, आपले मुख्य कर्म जे विद्यार्जन—अध्ययन व अध्यापन—ते या वर्गातील लोकानी व बदललेल्या काळास अनुसरून अशा रीतीने यथास्थीत करावे म्हणून ब्रह्मकर्म अथवा स्वाध्याय या शब्दाची थोडीशी व्यापक व्याख्या करून त्या विषयावर त्यानी एक ग्रथ लिहिला व त्यात आपल्या देशातील समाजाच्या हिताहिताचे जे निरनिराळे प्रश्न म्हणून त्या वेळी प्रचलीत होते त्यावरील आपले विचार जोरदार व स्पष्ट शब्दानी प्रसिद्ध केले. माझ्या मताने शतपत्री व स्वाध्याय या दोन ग्रथाना थोडेसे विशेष महत्त्व आहे. इतर ग्रथ माहितीने भरलेले व उपयोगी आहेत पण लोकहितवादीची विशिष्ट मतें व प्रतिपादनाची विशिष्ट शैली या गोष्टी या दोनच ग्रथात दिसतात. म्हणून इतर पुस्तकाचे जरूरीपुरतें व या दोहींचें विस्तृत असें परीक्षण करावें लागेल ते पुढील प्रकरणात करू. तूर्त त्याच्या खाजगी चरित्राकडेच पुन्हा वळतो. या दहाबारा वर्षातील सागावयाच्या ठळक गोष्टी म्हटल्या म्हणजे दोन. एक रतलामची दिवाणगिरी व दुसरी म्हणजे त्याच्यावर आलेल्या कौटुबिक आपत्ती. दयानदस्वामीचा व गोपाळरावजीचा परिचय अहमदाबादेसच

झाला होता. स्वामींनी आपल्या अखेरच्या दिवसात आर्यसमाज या संस्थेची सार्वजनीक व्यवस्था करून ठेविली त्यात गोपाळराव एक Trustee होते या कामासंबधाने त्याना वरचेवर उत्तर हिंदुस्थानात जावे लागे. अशा एका प्रसंगी रतलामचे महाराज व गोपाळरावजी यांची गांठ पडली व यांच्या निस्पृहपणाचा व कर्तेपणाचा त्यांच्या मनावर इतका परिणाम झाला की, त्यानी माझी दिवाणगिरी पतकरा अशी गोपाळरावजीस गळ घातली व मोठ्या मिनतवारीने ती यानी कबूल केली पण वृद्धापकाळामुळे काम होईना. लवकरच गोपाळराव ती नोकरी सोडून परत आले.

शेवटच्या दहाबारा वर्षांत त्यांच्यावर कौटुंबीक माणसाच्या वियोगाचे प्रसंग वारवार आले. तीन वडील मुलगे, बायको, दोन मुली, एक जावई वगैरे जिव्हाळ्याच्या माणसांच्या मृत्यूंनी त्यांचे मनावर व शरीरावर फारच परिणाम झाला होता. तरी सर्व दुःखे विवेकाने गिळून ते शेवटपर्यंत पुण्याच्या सार्वजनीक कामात पडत असत. कोठेही लहान मोठी सभा असो तेथे आपली गोपाळरावाची स्वारी हजर असावयाची व त्यांच्या विचाराचा फायदा सर्वांना सर्वत्र मिळावयाचा. त्यांच्या तरूण मनाची तडफ कधीच कमी न झाल्यामुळे त्यांच्या त्या व्यवसायात खंड पडल्यास त्यानाच करमेनासे होई. असे चालले असता १८९२ साली दसऱ्याच्या दिवशी घोड्यावरून सीमोल्लंघनास गेले असताना त्यांना पाऊस लागून ताप आला. दोनतीन दिवस अंगावर काढून राहिले. शेवटी दुखणें विकोपास जाऊन ता. ९ आक्टोबर रोजी त्यांचा अंत झाला!

गोपाळरावजींच्या आयुष्यांतील ठळक गोष्टी आतांपर्यंत सांगितल्या त्यावरून ते कोणत्या प्रकारचे पुरुष होते, त्यांचा स्वभाव, त्यांचें शील त्यांचें खाजगी व सार्वजनीक चारित्र्य कसे होतें याची थोडीशी

कल्पना वाचकाना आलीच असेल ती जास्ती स्पष्टपणानें यावी, जे काही मत झाले असेल तें तोलून पाहून कमी जास्ती करितां यावें म्हणून मला त्याच्या चरित्राचें व चारित्र्याचें मर्म म्हणून जें काय वाटतें ते थोडक्यात सागून मग त्याच्या ग्रथांकडे वळतों ऐहीक व धार्मीक अशा दोन्ही प्रकारच्या भावनाचे, विचारविकाराचे , सुदर मिश्रण त्याच्या स्वभावात झालेलें होते आणि याला माझ्यामतें कारणेही तशीच आहेत. त्याचे घराणे बालबोध जुन्या वळणाचे होते हे मागें सागितलें आहे पण तें शास्त्री किंवा भटभिक्षूक याचें मात्र नव्हते त्यामुळें कर्मठपणाकडे लहानपणापासून त्याचा ओढा थोडासा बेताचाच असावा, होताही पेशवाईतील वैदिक ब्राह्मणाची घराणी व गृहस्थाश्रमी घराणी याच्यात हा भेद अगोदरच झालेला होता लढायावर, स्वाऱ्या-शिकाऱ्यावर जाणाऱ्या शिपाई कारकुनात भटाभिक्षुकाचा कर्मठपणा रहाणे शक्य नव्हतें व नाही. देशमूख हे पाहिल्या वर्गात मोडत, व त्यांच्या पेशाला अनुरूप अशाच रीतीने त्याच्या घराण्यातील पुरुषाची कर्मठपणाची बधनें थोडी फार ढिली झालेली असतील गृहस्थाश्रमी ब्राह्मणाला नित्य कर्म करता येण्यापुरते वेदवेदागाचे त्याचे अध्ययन लहानपणी झालेलें होते, त्याप्रमाणें स्नानसध्यादी कर्मे ते नेमाने करीत याबरोबरच, इग्रजी शिक्षणाने व विशेषतः इतिहासाच्या अभ्ययनाने, निरनिराळ्या देशाचे आचार, त्याची राजकीय व सामाजीक स्थिती, त्याचे उद्योगधदे व व्यापार, त्याची समाजघटना इत्यादी गोष्टींचें निरीक्षण करून व तज्जन्य सिद्धात आपल्या परिस्थितीला लावून त्याना असें वाटत असे की, आपली धार्मीक व सामाजीक बधने फाजील जाचक आहेत. इतकेच नाही तर ती तशी आहेत हे चार शहाण्या लोकाना कळत असलें तरी ते बोलून दाखविण्याचे धैर्य त्याच्या अगात नाही व कृती करण्याचे तर नाहीच.

प्रत्येक गोष्टीला राजाश्रय पाहिजे असें आपले जुने वळण पण जुनी राज्यें गेली, जुने सरदार आपल्याच अज्ञानात व फिकीरीत गुतलेल. त्यामुळें बहुजनसमाजाला शास्ता किंवा नेता कोणीच नाही अशी त्याची स्थिती होती. तेव्हा आतां आपलें होणार काय, आणि कसें, हा विचार त्याच्या मनाला नेहमी त्रास देई व तरुण-पणातल्या उसळणाऱ्या रक्ताबरोबर त्याचे विचार जोरानें, कित्येक वेळा उच्छृखलपणानें बाहेर पडत. परतु याही वयात खऱ्या धर्माबद्दल पूज्यबुद्धी, सात्वीक अशी भावना त्याच्या मनात जागृत होती. मात्र व्यवस्थीत शिक्षणामुळें या धर्मभावनेला जो सौम्यपणा सहज यावयाचा तो लहानपणी आलेला नव्हता पुढें त्याना जगाचा अनुभव जसा अधीक येत गेला, जुन्या किंवा नव्या मतांचा सस्कार झालेल्या मडळीच्या गाठी पडल्या, तसें त्यांच्या विचाराना एक प्रकारचें सौम्य, पण स्वतत्रपणाचे-लहरीपणाचें-स्वरूप आलें

रा. नरसिहराव भोलानाथ ( दिवाटिया ) या प्रसिद्ध गुजराथी लेखकानी “गुजरात” मासीक पुस्तकाच्या अकातून “ स्मरणमुकुर ” या नावाची एक लेखमालिका नुकतीच लिहिली आहे तीतील एक लेख रा० गोपाळराव देशमूख याचेविषयी आहे. त्यात त्यांच्या अहमदाबाद येथील काही गोष्टी दिल्या आहेत, त्यावरून या विधानाला बळकटी येते. रा० दिवाटिया गोपाळरावाच्या धर्ममताचे पर्यालोचन करितांना म्हणतात—“ गोपाळरावाचा प्रार्थनासमाजाशी जरी सबध असला तरी इतराच्याहून ते थोडेसे वेगळे असत. त्याची श्रद्धा खरो-खर कशावर होती हें सागणें कठीण आहे. त्यांना मूर्तीची पूजा आवडत नसे. उलट त्याना असें वाटे की, आपल्या भोंवतालचे विश्व हें विश्वकर्त्यानें एक खेळणें तयार केले आहे. मनुष्यांचे आचारविचार, त्याची सुखदु:खें, ज्याला आपण ससार असें म्हणतों तो ससार

म्हणजे एका नदीच्या प्रवाहाप्रमाणे आहे. काठावर बसून पहावयाला मौज वाटते, घटकाभर मन रमतें, आश्चर्यचकीत होतें इतकेंच. ते या गोष्टीविषयी बोलू लागले किंवा विचार करीत असले म्हणजे अशा वृत्तीचें सूचक असे मंद हास्य त्यांच्या चेहऱ्यावर पुष्कळ वेळा झळकताना दिसावयाचे."

या प्रकारच्या अलिप्तपणाच्या वृत्तीची उदाहरणेही त्यांच्या आचरणांत पुष्कळ आहेत, याविषयी दिवाटिया पुढे म्हणतात—" प्रार्थना समाजाच्या व्यासपीठावर व्याख्यान देण्याकरिता उभी राहिलेली गोपाळरावाची मूर्ती मला अजून आठवते. त्यांचे ते किंचित् वाकडे घातलेलें दक्षिणी पागोटें, त्याच्याखाली, पोक्तपणाच्या रेषा असलेला, विस्तीर्ण भालप्रदेश, उंचट भुवया, विचार व वाणी यावर प्रभुत्व दर्शविणारी यांची भव्य मुद्रा या सर्व गोष्टी मला मूर्तिमंत दिसतात ते बोलू लागले म्हणजे विचाराच्या नादांत इतके तल्लीन होत की, आपण श्रोतृवृंदाला उद्देशून बोलतो आहोत, याचेही त्यांना भान नाहीसे होई. जणू काय स्वगतच बोलावें असे ते बोलत दोरीचे लहान लहान तुकडे जोडून एखादी लांब माळ तयार करावी, त्याप्रमाणे जे सुचतील ते विचार, जसे येतील तसे शब्द ही त्यांची पद्धत. त्यांना विषयांची वाण कधी वाटली नाही. संसार काय किंवा परमार्थ काय, सर्वच गोष्टींकडे उदासीनपणाने, सस्मित उपेक्षापूर्वक पहाणाऱ्या एखाद्या तटस्थ तपस्व्याप्रमाणे त्यांचे वागणें असे.

"रोजच्या व्यवहारांत या उदासीन वृत्तीचा परिणाम नेहमी दिसावयाचा नाही. उलट, कोणीही त्यांचेकडे भेटावयाला म्हणून येवो, कशाही कामाकरितां येवो, त्यांचें म्हणणें, शांतपणानें ते ऐकून घेत. सकाळी फिरावयाला गेले म्हणजे धर्मशाळा, देवळें, असतील त्या

बाजूला जात व बैरागी, गोसावी कोणी उतरले असतील त्याच्याशी तास तास प्रेमळपणानें बोलत असत. घरी परत येताना घोड्यापुढें धावणारा पोरगा दमला तर त्याला आपल्या मागे बसवून परत आणीत न्यायासनावर बसले म्हणजे मात्र हा दयाळूपणा त्याना माहीत नव्हता वकील अशीलाच्या गोंधळामुळे न गोंधळता शातपणाने जो न्याय तोच देत हे सर्व गोपाळराव निरानिराळे असून एक व एक असून अनेक अशा प्रकारची लोकोक व्यवहारात त्याची समवृत्ती होती."

केव्हा केव्हा मात्र कळत म्हणा किंवा नकळत म्हणा गोपाळरावा-कडून व्यवहारादृष्टीने पाहाणाराला विक्षिप्तपणाचे वाटेल असे वर्तन होई. याचा एक मासला म्हणून दिवाटियानी सागितलेली एक गोष्ट येथें सागतो. ती अशी'—"एक दिवस माझे वडील भोलानाथ हे रावसाहेबाच्या ओट्यावर बोलत बसले असता त्यानी प्यावयाचे पाणी मागितले. जवळ नोकरचाकरापैकी कोणी नव्हते. इतक्यात समोरून एक बाई चालल्या होत्या त्याच्याकडे गोपाळरावांची दृष्टी गेली. त्यानी बसल्या ठिकाणाहूनच, आहो ( बिजली ) बाई, जरा इकडे या, अशी मोठ्याने हांक मारिली. बाई आत आल्या व गोपाळरावानी सागितल्याप्रमाणे त्यानी घरातून पिण्याचें पाणी आणून दिलें. भोलानाथ हा प्रकार पाहून चकीतच झाले. आपल्या गावचा गोविंदभट पड्या, त्याची बायको ही बिजली, गोपाळरावाची आणि हिची ओळख कुठली आणि कशी ! गोपाळराव साबरमतीवर प्रातःस्नानाला जात असत तिथें घांटावर बिजली ही इतर बायकासारखी जात असे इतकेंच अशाच सारखी, डिस्ट्रिक्ट जजसाहेब एक दिवस घरी भेटावयास आले असतां, त्यांना बसावयास खुर्ची वगैरे न देता, ओटीवर पडलेल्या एका मोडक्या तोडक्या पेटाऱ्यावर बसवून आपणही तेथेंच बोलत

बसले अशी एक गोष्ट दिवाटियानी सांगितली आहे. बारीकसारीक गोष्टींत त्याचें लक्ष नसे हींच गोष्ट खरी.

परंतु मुख्य मुद्याची गोष्ट आली म्हणजे मात्र ते कधी भान विसरले किंवा गैरसावधपणानें वागले असें होत नसे. एखाद्याकडून आपलें काम करून घ्यावयाचें म्हणजे आर्जवानें, युक्तीनें तें कसें करून घ्यावे हें त्यांना चांगलें कळत असे. धोरण, शांतपणा, गोड भाषण जें कांहीं सर्व असेल तें त्यावेळी यावयाचें. गुजराथ कॉलेजच्या स्थापनेविषयीं खटपट गोपाळराव अहमदाबादेस असतानाच चालली होती. गांवांत व्यापारी मंडळीत वर्गणीची याद फिरत होती, त्यात एका कृपण म्हणून नांवाजलेल्या गृहस्थानी पंचवीसाचा आंकडा टाकिला. गोपाळरावाच्या बरोबर आलेली इतर मंडळी या शेटजींचा आंकडा मोठा पडणार या आशेवर होती, ती अगदी निराश झाली. त्यानी मात्र निराशेचें चिन्ह थोडें देखील दर्शविलें नाही. शेटजीच्या बरोबर बोलता बोलतां, त्याच्या मुलाबाळाच्या, व्यापार उदीमाच्या गोष्टी काढाव्या, हळूच वर्गणीचे बोलावे, असे करिता करिता तास दोन तासांनी २५ चे ५०, १०० असा शेटजींचा आंकडा शेवटी ५०० पर्यंत गेला तेव्हा गोपाळराव उठले. अशाच प्रकारची दुसरी एक गोष्ट रा० दिवाटिया यानी सांगितली आहे व तीवर टीका करितांना जो अभिप्राय व्यक्त केला तोही मोठा मार्मीक आहे. गोपाळरावजींची ती भव्य मुद्रा, त्याचें स्मितहास्य, बेफिकीर वृत्तीची निदर्शक अशी त्यांची दृष्टी या गोष्टी पाहून मनाला असें वाटे हा पुरुष मोठा वस्ताद असला पाहिजे. हा सगळें जग इकडचें तिकडे करील, पण जगाला मात्र हार जाणार नाही.

अखेर अखेरीच्या दिवसात, कौटुंबीक आपत्तीमुळें, वाढत्या वयोमानाबरोबरच गोपाळरावजींची विरक्ती जास्त जास्तच होत गेली. या

संबधाची एक गोष्ट पुणें येथें त्याच्या मृत्यूनंतर दुखवट्याची सभा झाली, तेथें भाषण करिताना सुंदरलालजी नांवाच्या एका वक्त्यानी सांगितली होती. ती त्यांच्या स्वभावाची उत्तम निदर्शक अशी वाटते म्हणून येथें सांगून हा चरित्रात्मक भाग आतां आटोपता घेतों.

"कै० रा० ब० देशमूख हे एक साधू पुरूष होऊन गेले असे माझे मत आहे. कोणत्याही सत्कार्याविषयीं त्याचें प्रेम व उत्साह ही अद्वितीय होती. त्यांची सरळ व साधी वृत्ती खऱ्या साधू पुरुषाशिवाय कोणामध्येंही आढळावयाची नाही. त्याना कधीही राग आलेला कोणीही बघितल्याचें, निदान वीस पचवीस वर्षांपासून जो त्याचा माझा परिचय होता त्या मुदतीत, काहीं कोणी मला सांगितले नाही. काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर व अहंकार या षड्रिपूंचा त्यानीं पूर्णपणें जय केला होता, असें त्यांचे आचरण एकदरीनें आपण ध्यानात आणून बघितलें म्हणजे आपल्याला समजून येईल. हर्ष किंवा विषाद ही त्याजमध्यें भिन्नतेनें दृष्टीस पडल्याचे कोणालाही माहीत नाही. सर्वदा समानवृत्ती धारण केलेली, असा हा एवढाच योगमार्गी पुरूष माझे पाहण्यात आला. रा० ब० देशमूख साहेबांचे ब्यारिस्टर चिरंजीव वारले, त्याचे दुसरे दिवशी मी त्याचेकडे आर्यसमाजाचे काही कामासाठी बाहेर जावयाचें होते म्हणून त्यास बरोबर घेण्यासाठी गेलो. ते बाहेरच बसले होते. मला पाहिल्याबरोबर त्यानी आपला आंगरखा—पागोटें घरातून मागविलें. व समाजाचे संबधानें ते मजबरोबर बोलू लागले. तितक्यात घरातून एक मनुष्य मजकडे येऊन मला एकीकडे नेऊन सांगू लागला कीं; त्याचे प्रियपुत्र कृष्णराव वारले व त्याचें प्रेत दहन करून नुक्तीच मंडळी घरीं आली आहे. हें ऐकून मला अतिशय वाईट वाटलें. व मी रावसाहेबांस, अशा दुःखाचे प्रसंगी मी आपल्याला बाहेर घेऊन जावयाचे श्रम

देणें अगदी अयोग्य आहे, असें म्हटलें. ते म्हणाले, ह्या प्रसंगाबद्दल विषाद मानून आर्यसमाजाचे कार्यासाठी आपल्याला जें करावयाचें तें करण्यात उदासीनता दाखविणें हे माझ्या मतानें चांगलें नाही पुढे रा० ब० म्हणाले, संसारात घडणाऱ्या अशा गोष्टीविषयी विषाद मानता उपयोग नाही व त्याचप्रमाणे मोठी काही कार्यसिद्धी झाली म्हणून तिजबद्दल हर्षही होऊ देता कामा नये मी आपल्याकडून माझे मुलास विद्याज्ञान देण्याचे संबधानें कोणत्याही प्रकारची हयगय केली नाही पुढे ज्याचे त्याचें नशीब ज्याचे त्याच्या बरोबर आहे संसार हा सुखदु:खमय आहे. तेव्हा त्याचेविषयी हर्षविषाद मानण्याचे कारण नाही देशमुखाची ही समानवृत्ती पाहून मला काय वाटले असेल ह्याची कल्पना आपणच करावी! अशा वृत्तीच्या पुरुषास योगी म्हणू नये तर काय म्हणावे? नाशकास ते जॉइंटजज्जाचे हुद्यावर असताना त्याचे एका नौकरास अतिशय ज्वर आला त्याला दवापाणी देशमूख साहेब हे स्वत: बसून देत होते व दुसरा एक नौकर त्या आजाऱ्याचे पाय चुरीत बसला होता. त्याला आजाऱ्याने जास्त जोराने पाय चेपण्यास सांगितले तितक्यात त्या दुसऱ्या नौकरास देशमुखानीं आजाऱ्याच्याच दुसऱ्या काही जरूरीच्या कामास घरात पाठविले व आपण त्या आजारी नौकराचे पाय दाबीत बसले हें त्या आजाऱ्यास मुळीच कळलें नाही आजारी मनुष्य पुन: रागावून शिव्या देऊन आपल्या सोबत्यास म्हणून आणखी जोरानें पाय दाबावयास सांगू लागला. व तें रा.ब.देशमुखानी ऐकून घरात पाठविलेला नोकर येईपर्यंत त्याचे पाय विशेष जोराने चेपणें चालविलें होतें! अशी समबुद्धी कोणत्याही पुरुषामध्यें आढळणें कठीण आहे."

---

*

लोकहितवादी याच्या चरित्रातील ठळक ठळक गोष्टीचा परिचय आतापर्यंत वाचकाना मी करून दिलाच आहे या गोष्टीचे वर्णन करीत असता आरभी गोपाळराव जन्मले त्या सधिकाळातील अस्ताला जाणाऱ्या परिस्थितीचें क्षणोक्षणी पालटणारे स्वरूपच विशेषत. मी आपल्या डोळ्यापुढें ठेविले होते उदयोन्मुख परिस्थितीचें त्यावेळीं नुसते दिग्दर्शन केलेलें होतें यापुढें गोपाळरावाचे चारित्र्य, त्याचे विचार, त्याची मते याचें विवेचन करिताना तेवढ्यानेच भागणार नाही ज्या परिस्थितीत ते वाढले, त्याची मते बनली, त्याच्या कर्तृत्वाला आरभ होऊन त्याचे स्वरूप व दिशा ही ठरली त्या परिस्थितीची जास्त स्पष्ट कल्पना वाचकाना करून देऊन परिस्थिती व तिला अनुरूप तयार होणारी मते याची जोडणी करून दिली पाहिजे म्हणून गोपाळराव तरूण होते त्या काळच्या परिस्थितीचे या दृष्टीनें पुन्हा एकदा थोडक्यात विवेचन करितो.

इग्रजी अमल या देशात निरनिराळ्या वेळी बसला तसेच त्याचे निरनिराळे प्रकारही झाले बगाल.मद्रास या प्रातातून म्हणजे ज्या ठिकाणी त्याच्या अगोदर पासूनच परकी राज्ये होती व राजसत्ता निर्बल झाल्यामुळे बेबदशाहीचा अनुभव प्रजेला आला,त्या ठिकाणी एक परकी राज्य गेले व दुसरे आले या पलीकडे कोणालाही काही वाटले नाही नवीन आले त्यामुळे मुलुखाचा बदोबस्त झाला व लोकाना सुखसमाधान वाटावयास लागले अशा प्रातातून लोकाचे जे नैसर्गीक पुढारी होते, जमीनदार, पाळेगार, देशमूख वगैरे होते, त्याचे कर्तव्य ओघानेच ठरलें. नवीन आलेले स्वीकारावें, त्याचीच कास धरावी, नवे ते चागले व आपण जित असल्यामुळे जें त्याचें तें सर्व चांगलेच असले पाहिजे असा विचार करून ते मार्गाला लागले. बगाल, मद्रास या प्रातांत इग्रजी

वाङ्मय, इंग्रजी तत्त्वज्ञान, इंग्रजांचा इतिहास, इंग्रजी संस्कृती यांचे महत्त्व या कारणांमुळें इतर प्रांतांपेक्षा पुष्कळच अधीक होतें व अजूनही आहे. महाराष्ट्रांत मात्र असा प्रकार झाला नाही. कसे झाले तर महाराष्ट्रांत स्वराज्य होतें. तेव्हां ते ज्यांनी घेतलें त्याबद्दल येथील प्रजेच्या मनांत, विशेषत जहागीरदार, इनामदार, देशमूख, देशपांडे यांच्या मनांत—स्वराज्य गेल्यामुळे ज्या पांढरपेशावर्गाचें प्रत्यक्ष आर्थीक नुकसान झालें त्यांच्या मनांत—थोडीशी तेढ राहिलीच.

त्यामुळें नवीन संस्कृतींत जे कांही चांगले होते तेवढे घेण्याचे धाडस किंवा जुन्यांत जरूर तेवढाच फरक वेळींच करण्याची सुबुद्धी त्यांना झाली नाही. लोकांचे नैसर्गीक पुढारी परिस्थितीला पाठमोरे होऊन कचरले व बुद्धीने, करामतीनें, हिमतीने तरूण पण खानदानीत कमी अशा उपऱ्या लोकांना पुढे येण्याची संधी मिळाली. पेशवाईच्या अखेरच्या दिवसांतच अशा बुद्धिमान व कर्तृत्ववान लोकांना स्वराज्यांत वाव नाहीसा झाला होता एरवी, ज्या रीतीने नाना फडणवीस, हरिपंत फडके, किंवा पटवर्धन मंडळी पेशवाईच्या आरंभी आपल्या आंगच्या गुणांनी झटकन् पुढे आली, त्याप्रमाणे बाळाजीपंत नातूसारखा धोरणी व कर्ता पुरुष रावबाजीच्या अमदानींत पुढे यावयाला काय हरकत होती? पेशव्यांनी यांना पुढें आणलें नाहींच, पण त्यांच्यासारखी मंडळी हाताशी धरून चतुर इंग्रजी मुत्सद्यांनी आपला मात्र डाव साधून घेतला. पण अर्थातच या उपऱ्या मंडळींचें महाराष्ट्रातील लोकांवर वजन कधी पडलें नाही व त्यामुळें इंग्रजांनीही यांना आपल्या कामापलीकडे कधीं फारसें विश्वासांत घेतलें नाही घडून आलेल्या क्रांतीच्या दिवसांत या मंडळींनी आपल्या पोळीवर तूप ओढून घेतलें खरें. पण त्या बरोबरच जुन्यानव्याचा सांधा बसवावयाचें काम मात्र केलें नाही असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. घडून आलेला फरक इतका

विलक्षण होता, कीं, कदाचित् हे काम तावडतोब त्याच्या बरोबर होणें हीही गोष्ट त्यावेळी कदाचित् अशक्य वाटली असेल. काम झाले नाही एवढें मात्र खरें. व त्यामुळे नव्याजुन्यामधील दुवा साधण्याचे काम एका पिढीने मागे पडले, हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. हे काम करावयाचे कोणी? अर्थातच इंग्रज अधिकाऱ्यांपैकी ज्याची सदिच्छा होती ते एल्फिन्स्टन, बेंटिकसारखे अधिकारी व ज्याना नवीन संस्कृतीचे रहस्य समजले, त्याचप्रमाणें आपल्या गुणदोषाचे ज्ञान झाले असे आपल्यातीलच शहाणे, वजनदार पुढारी यानी मिळून हें काम करावयाचे होते व तसेच ते व्हावयास आरंभही झाला होता. बंगाल्यात राममोहनराय, देवेंद्रनाथ टागोर, केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र इत्यादि मंडळीच्यावर हे काम पडले, तर आमच्या महाराष्ट्र मुंबईकडे, नाना शंकरशेट, गोपाळराव देशमुख, दादाभाई नौरोजी, कर्सनदास मूळजी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, जीजीभाई बॅरोनेट अशा निरनिराळ्या जातीतल्या निरनिराळ्या पुढाऱ्यावर पडले. तेव्हा त्या काळाचे स्वरूप लक्षात घेता "**नृपतिजनपदानां दुर्लभकार्यकर्ता**" अशा कोटीतील जी पुढारी मंडळी त्यावेळी तयार झाली त्यात गोपाळरावाचे नाव घालावे लागेल असे मला वाटते. हे गोपाळरावाच्या चारित्र्याचें मर्म आहे. आता गोपाळरावानी आपले हे काम कसे केले, त्याच्या शिक्षणाचा, परिस्थितीचा उपयोग त्याना कितीसा झाला, व परिस्थितीमुळें त्याना अडचणी काय काय आल्या हे विस्तारानें पहावयाचे आहे.

पेशवाईअखेरपासून तो राणीचा जाहीरनामा हातात येईपर्यंतच्या मधल्या काळाचें जर वर्णन करावयाचें असेल तर त्याला 'The Period of Benevolent Despotisim' असे नाव द्यावे असे आम्हाला वाटतें. आपली संस्कृती श्रेष्ठ प्रकारची आहे खरी, पण माणसाच्या अंगी असलेल्या वैयक्तीक (Private) सद्गुणांचा विकास

तीमुळें चागला होत असला तरी सामाजीक गूण, सामाजीक कर्तव्याची जबाबदारी या गोष्टीचा विकास मात्र तीमुळे तितका होत नाही. तेव्हा अप्रीय पण पथ्यकर असें इग्रजी शिक्षणरूपी औषध आपण हिंदू लोकाना दिले पाहिजे, त्याच्यांतील अनिष्ट चालीरीती काही शिक्षणानें, काही कायद्याने, बद केल्या पाहिजेत मग हे करिताना लोकाची जरा अप्रियता सपादावी लागली तरी हरकत नाही अशिक्षीत, अज्ञानी अशा प्रचड जनसमूहाने परकीय अमलाला कटाळून कधीना कधी तरी बड करावें, व मूटभर गोऱ्या लोकाच्या जोरावर स्थापिलेली सत्ता एका क्षणात नाहीशी होऊन देशभर बेबदशाही माजावी, असे होण्या-पेक्षा सुशिक्षीत लोकानी आपला कारभार आपण करायाला शिकावें व मग त्याच्या चळवळीमुळे आपल्या आजच्या अनियमीत सत्तेला पुढेमागे नियत्रण बसले तरी ते पुरवले अशा प्रकारच्या उदार धोरणानेच इग्रजी मुत्सद्याचा कारभार चालला होता मिल, बेथाम याच्या तालमेत तयार झालेली मेकॉले—बेंटिकसारखी इग्रज मुत्सद्दी मडळी एका बाजूचा पुरस्कार करीत होती. तर या धोरणाने व्यापाराला धक्का बसेल की काय अशी भीती वाटणारे कपनीचे डायरेक्टर व जुन्या सस्कृत विद्येला भाळलेले विल्सनसारखे पडित दुसऱ्या बाजूला होते. या लढ्यात मेकॉले प्रभृतीच्या मताला यश आले.

बदललेल्या परिस्थितीचे हे मर्म ओळखून व झालेल्या फरकातच आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयाची बीजे गूढरूपाने साठविलेली आहेत ही खूणगाठ मनाशी बाधून या नवीन दृष्टीने आपल्या समाजात दोष कोणते आहेत याची पाहाणी करावी व ते काढावे कसे हे ठरवावे; लोकांना त्याच्या वाईट चालीरीती व समजुती याचेमुळें काय तोटे होतात तें समजून सागावें, अशा प्रकारचे लोकहितवादाचें काम कोणीतरी अवश्य करावयाला पाहिजेच होतें. व त्यातल्यात्यात विशे-

षतः जुन्या जहागीरदार, इनामदार घराण्यातील मडळींनी पुढाकार घेऊन ते केलें असतें तर विशेष त्रास न पडता ते झालेही असते या वर्गातील मडळींचे आपल्या समाजांत स्वाभाविकपणेच वजन होतें. बहुजनसमाजाला त्याच्याबद्दल थोडासा तरी आदर वाटत होता; व त्यानी नव्या चालीरीतीचा मोकळ्या मनानें व योग्य त्या मानाने पुरस्कार केला असता तर लोक त्या मताला मान देऊन त्याच्या मागें गेले असते पण हें व्हावे कसें ? या कुलीन व सभावीत मडळींना शिकण्याची, लिहिण्यावाचण्याची हौस फार कमी होती. त्याच्या भोवतालची आश्रीत, भिक्षूक, वैदीक, पुराणीक वगैरे मडळी त्याना सागे की, महाराज या म्लेच्छ विद्येच्या मागे आपण लागू नका आपल्या पूर्वजानी चाली घालून ठेविल्या आहेत त्या काय वाईट असतील की काय ? व ते या मडळींना खरेंही वाटे लोकहितवादी याच्या शतपत्रातील आरभीच्या काही पत्रात या स्थितीचे वर्णन चागले केले आहे. त्यातून नमुन्यासाठी काही उतारे येथे देतो

"पुणे येथील नेटिव्ह जनरल लायब्ररीची स्थापना" या विषयावरील ता. २६ मार्च १८४८ रोजी प्रभाकर पत्रात प्रसिद्ध झालेल्या लेखात खालील मजकूर आहे:—

"पुण्यातील बहूत गृहस्थास साप्रतकाळीं विद्या आणि ज्ञान काय आहे याविषयी समजूत नाही व ते आज बहूत वर्षे घरीं स्वस्थ बसून इग्रज सरकारची देणगी खात आहेत. यामुळे अशा कामात ते झटून पडत नाहीत व त्याना कितीही समजून सागितले तरी त्याच्या जुन्या व पोकळ समजुती आहेत त्याच ते खऱ्या धरतात, व त्या बदलण्यास बहूत दिवस पाहिजेत. याचकरिता दुसऱ्या सभेत जास्त पैसा जमला नाहीं . अद्याप गृहस्थापैकी कोणी ग्रथ वाचावयास येत नाहीत. शाळेंतील विद्वान मडळी मात्र येतात. सरदार लोक येत नाहीत.

त्याविषयीं मला असें वाटतें की, आम्ही थोर, चार शिपाई अबदागीर बरोबर घेतल्याशिवाय बाहेर कधी पडत नाही. तेव्हा लायब्ररीत मुलासारखें शिकण्यास जावयाची त्यांना लज्जा वाटत असेल. पण अज्ञानामुळें आणि अश्रुतपणामुळें त्यांची अशी अवस्था झाली. तथापी तिचा परिहारोपाय ते ग्रहण करीत नाहीत हें आश्चर्य आहे. ज्यास अन्नवस्त्र मिळतें ते म्हणतात की आम्हांस विद्येची काय गरज आहे. व ज्यास मिळत नाही ते पोटापाठीमागे लागतात. तात्पर्य, अक्कल वाढविण्याचें काम कोणाच्यानेंही होत नाही." ही खोडी नेटिव्ह लोक लवकरच टाकतील तर बरें होईल. पूर्वीं याची हीच खोडी होती, परतु बाहेर ती गोमीसारखी दिसत नव्हती. कारण पुण्यात पेशव्याचें राज्य होतें. त्यामुळे कितीएक प्रष्ठितेनें पैसा मिळवीत होते. म्हणून त्याचे ज्ञान-अज्ञान आजपर्यंत दिसलें नाही. परतु आता तो समय नाही. आता बाहेर काय आहे हे समजून आपली नीट अवस्था कशानें होईल हे पाहण्याची वेळ आहे. म्हणून नेटिव्ह लोक आतां आळस व गर्व न करतील तर फार चागले होईल."

त्याचप्रमाणे दुसऱ्या एका पत्रात ( न. ५ ) ते म्हणतात:—

"हिंदू लोक हे आजकाल गाढ निद्रेत आहेत व ती जाण्यास बहूत ग्रंथ व बहूत ज्ञान पसरले पाहिजे. व असें होण्यास बहूत काळ पाहिजे. व त्यास मुख्य अडचण अशी आहे की, साप्रत काळचे द्रव्यवान ब्राह्मण लोक यास आडवे येतात. म्हणून हे लोक जाऊन नवी प्रजा येईतोंपर्यंत हिंदू लोकाची सुधारणा होईलसें वाटत नाहीं. इतर जातीचे लोक तर सागितलेलें ज्ञान ग्रहण करावयास सिद्ध आहेत. परतु ब्राह्मण लोक तसे नाहीत. पूर्वींपासून त्यांची समजूत अशी पडलेली आहे की, आम्ही पृथ्वीवर देव आहोंत व देवही आमचे हाती आहेत व आमचे आशीवार्दानें व शापानें पाहिजे तसें

होईल. पृथ्वीवर आमच्या इतके शहाणे लोक कोणीच नाहीत व आमच्या देशाशिवाय पृथ्वीवर काही देश नाही. इंग्रज लोक हे समुद्रातील बेटांतील माकडासारखी मनुष्यें इकडे आली आहेत इत्यादी वेडगळपणाच्या समजुती बहुतेक ब्राह्मणाच्या आहेत. व जों जों ब्राह्मण लोक श्रीमत होतात तो तों ज्ञान कमी होतें. जे मोठाले सरदार व जहागीरदार आहेत त्यास पृथ्वीवर काय होते याची खबर नाही. झोंपेंत, निशेंत व स्त्रियांच्या सगतीत ते निमग्न असतात. परतु येणेकरून काय उपयोग ?

बाजीराव पेशव्याचे शाळेतील शिष्य बहूत झाले आहेत. त्यास अतिशय गरिबी आल्याशिवाय भ्रांती जाईल असे दिसत नाही जशी नवज्वरास बहूत लघनें पाहिजेत तसें हें आहे विद्येचा उपयोग पोटास मिळवावयाचे, इतके मात्र लोक समजतात पण ते असे मनात आणीत नाहीत की, मनूनें इतके ग्रथ व व्यासानी अठरा पुराणें लिहिली हे काय ? त्यास वेतन कोणी ठरविले होते ? विद्यावृद्धीची चाल ब्राह्मणानी सोडली म्हणून त्यांची अशी अवस्था झाली आहे.''

याचप्रमाणे १८ नबरच्या पत्रात 'आर्जवीपणा व डौलीपणा' हा बिषय घेऊन, व नबर चारच्या पत्रात पुण्यातील शिमग्याच्या सणाचे वर्णन करिताना, श्रीमत व गरीब अशा दोन्ही प्रकारच्या लोकाचे दुर्गूण गोपाळरावानी दाखविले आहेत. देशातील कुलीन व नैसर्गीक पुढारीपणा ज्याच्या हातात होता अशा पाढरपेशा लोकाचा वर्ग हा असा होता. यामुळे, या वर्गाच्या राजानिष्ठेबद्दल शंका असल्यामुळे सरकार या मडळीना जवळ करीत नसे. हुद्याच्या जागा वगैरे द्याव-याच्या झाल्या म्हणजे बुद्धिमान, कर्त्या, पण उपऱ्या अशा लोकांना त्या दिल्या जात व त्यामुळें खालच्या अधिकारी वर्गात लाच, अेरेरावी, लोकाविषयीं बेपर्वाई, खुषामत करणें वगैरे अनेक दुर्गुणांचें प्राबल्य होतें;

साहेब लोक थोडे व परकीय आणि आमच्या भाषेला, रीतिरिवाजाना पारखे असल्यामुळें या खालच्या अमलदारांचेच प्राबल्य कारभारात विशेष होते. सरकारचे कायदेकानू सुधारत असूनही त्याची अमलबजावणी करणारे अमलदार वाईट असल्यामुळे रयतेच्या दृष्टीनें दररोजच्या कारभारात फारसा फरक झाला नाही व नेकीचे खानदानीचे सरकारी अधिकारी असले म्हणजे लोकाच्या चालीरीतीना त्याच्या उदाहरणामुळे जे एक इष्ट वळण लागते ते तितके लागले नाही या परिस्थितीचे मार्मिक विवेचन लोकहितवादी यानी काही पत्रात केले आहे

पत्र नं. १ व नं. ९ अशी दोन पत्रे नेटिव्ह अमलदार या विषयावर आहेत. पुण्यातील एका ब्राह्मण अमलदाराविषयी त्या वेळी पत्रातून बराच गवगवा झाला होता व त्यांत थोडेसे तथ्यही होते. त्यावरून ब्राह्मण तेवढे लबाड अशी ओरड काही ठिकाणी सुरू झाली त्या प्रसगाला अनुलक्षून गोपाळराव म्हणतात.—“ ब्राह्मण लोकानी वाईट वर्तणूक केली असे अनुभवावरून वाटते ते खरे आहे. परतु त्याचा दोष ब्राह्मणाकडे नाही कारण चागले वाईट लोक सर्व जातीत असतात. पण त्यापैकी पक्का शोध करून चागले कुलीन सभावीत, नीतिमान असे असतील त्यास अधिकारावर नेमावे. धर्मशास्त्रमयूरवात प्रथमतः श्लोक आहे तो असा की,

> **व्यवहारान्नृपः पश्येत विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह**
> **धर्मशास्त्रानुसारेण लोभक्रोधविवर्जितः ॥ १ ॥**
> **श्रुताध्ययनसंपन्ना धर्मज्ञाः सत्यवादिन**
> **राज्ञा सभासदः कार्या रिपौ मित्रे च ये समाः ॥ २ ॥**

याप्रमाणें बहूत अध्ययन केलेले, बहूत ऐकिलेले, धर्म जाणणारे सत्य बोलणारे, निःपक्षपाती सभासद राजानें अधिकारावर नेमावे म्हणून आहे. त्याप्रमाणें जर ब्राह्मण लोक नेमिले असते तर असें कां

होते ? इंग्रजी राज्यात हें रयतेचे दुर्दैव आहे की, ज्या साहेब लोकांच्या हाती नेमणुका द्यावयाच्या असतात. ते त्या देतवेळेस कांही विचार बघत नाहीत मनास येईल त्यास देतात. त्याची विद्या, गुण नीती, अब्रू याचा शोध घेण्याचे श्रम करीत नाहीत, म्हणून अयोग्य लोक मोठमोठ्या जागावर मुकर होऊन लाचेचे वगैरे मोठे बोभाट उठले आहेत साहेब लोकाचे हाती राज्य गेले परतु ते इकडील लोकाप्रमाणे काम करण्यात माहीतगार आहेत असे नाही ते विद्वान, शहाणे, नि.पक्ष-पाती आहेत, पण देशाचो व भाषेची माहिती नेटिव लोकाप्रमाणें त्यांस नाही. यामुळें नेटिव लोक जे त्याचे हाताखाली असतात त्याच्या हाती रयतेचें बरेवाईट करण्याचे असते गरीब लोकास कामगार हेच साहेब असतात आणि हे वाईट चालीचे—आशाबद्ध व द्रव्यलोभी असतात म्हणून लोकास फार छळतात. साहेब लोक मोठे काम त्यास देतात. त्याची हुषारी मान पाहतात, पण कामगाराचे फक्त हुषारीचा काय उपयोग ? ती शिवाय दुसरे बहूत गूण त्यास पाहिजेत... पुण्यात सरजामवाले सभावीत गृहस्थ आहेत. परतू त्यातील चांगला मनुष्य आणि विद्वान आजपर्यंत कामावर कोठे नेमिला आहे असे नाही . . याप्रमाणे कुलहीन लोक इंग्रजाचे दरबारात फार जमले आहेत.. .येणेंकरून लोकाची अब्रू जाते आणि ठेवणाराचे बुद्धीचीही प्रशसा होत नाही याचा बदोबस्त लवकर होईल अशी आशा आहे."

त्याप्रमाणे नेटिव कामगारांविषयी दुसऱ्या लेखात ते म्हणतात— जे नेटिव कामगाराशी सबध ठेवतात त्यास हें विदीतच आहे. व नेटिव कामगारामध्यें चांगला गुण कोणता असतो हे तरी मनांत आणा. हे बहूतकरून अविद्वान, ढोंगी व लबाड असतात. खर्चे तरी कसा निभेल असा विचार करून पहिल्यानें भयानें व लज्जेनें खऱ्याकडून पैका घ्यावयास आरभ करितात. व मग एकदां संवय

पडली म्हणजे अगवळणीं पडते नतर लिलांव सुरू करतात म्हणजे जो अधिक बोलेल त्याचा फैसला होतो. अशा तर गोष्टी हमेश पाहण्यात येतात. व डौल करणारे हे लोक असे आहेत की, आपली योग्यता व थोरपणा काही जाणत नाहीत. यांनीं कचेरीतून घरी जाताना रोज शिपाई बरोबर नेत असावें आणि त्यामध्ये आपण डुलत डुलत डौलाने चालावें, म्हणजे घरच्या बायका किंवा रांडा यांनी आपले यजमानास पाहून धन्य मानावे. अशाकरिता हे प्रयत्नानें शिपाई मिळवतात व पुढे चालवितात असे कांहीं चमत्कारीक रिवाज या मूर्खांचे आहेत. . तात्पर्य सांप्रतचे नेटीव अमलदार मूर्ख आहेत. यास इग्रज आतां चाकऱ्या देतात एवढ्याही देण्याची योग्यता याजमध्ये नाही. परतु इग्रज मेहेरबानी करितात. मी एकदां खेड्यांत एका कुणब्याचे तोडानें ऐकिले की, साहेबाचें राज्य चागले, साहेब न्यायइनसाफ चागला करतो, पण ब्राह्मण लोक त्यास शिकवून आमची घरें बुडवितात आणि बहुतकरून सर्व रयतेची समजूत अशीच आहे आणि ती खरी आहे. हे हलकट लोक फार प्रळय करतात आणि त्यास आशा फार म्हणून जोपर्यंत नेटीव लोक लोभी व दुर्गुणी आहेत तोपर्यंत त्याचा पक्षपात कोणी धरावा ? "

इग्रजी अमलाच्या अवलीस मराठी समाजात जे गुणदोष विशेषतः दोषच—दिसत होते त्यापैकी एक दोहींचें वर्णन आतापर्यंत होईल तों लोकहितवादीच्या विचारसरणीला अनुसरून व त्यांच्या भाषेतच केलें आहे. अशाच दृष्टीने सर्व शतपत्रांची छाननी करू लागल्यास पुष्कळच जागा लागेल, तेव्हा तसे न करतां थोडक्यात त्या शतपत्रांचा सारांश काय तें आता सांगतों. समकालीन समाजात व विशेषतः त्या वेळच्या पुढारलेल्या पाढरपेशा—ब्राह्मण भटभिक्षुक—वर्गात लोकहितवादीना जे दोष दिसले त्याचे वर्गीकरण असें करिता

येईल (१) स्त्रीपुरुषाच्या परस्पर संबधात असणारी विषमता. ही विषमता बालविवाह व विधवाविवाहाला प्रतिबंध या दोन कारणानी उत्पन्न झाली व हिचा शेवट सामाजीक सार्वत्रीक अनाचारात झाला आहे. (२) जातीजातीतील विषमता हीमुळे समाजात एकाच वर्गाला किंवा जातीला फाजील महत्व मिळून इतर जातींचे त्यामुळें नुकसान झाले आहे. त्याच्या श्रमाचें चीज होण्याला अवकाश नाही, वरिष्ठ जातीना समाजाकडून शासन होण्याची भीती नसल्यामुळे त्यांच्याकडून आपापली कर्तव्यें बरोबर होत नाहीत व एकदरीत समाजाला हीनपणा आला आहे (३) पुरुषानी स्त्रियांना व वरिष्ठ जातींनी खालच्या जातींना ताब्यात ठेवण्याकरिता धर्म व रूढी याची निकट सांगड घालून ठेवल्यामुळे कर्मठपणा व शब्दछल या गोष्टीना फाजील महत्त्व आले. व त्यामुळे धर्माचे तेज लोपले ब्राह्मण वर्गाचा कर्मठपणा ढोंगीपणा राष्ट्रहिताचा आड येऊ लागला. भिक्षुकवृत्ती, ऐदीपणा, चैन, परावलंबीपणा इत्यादी अनेक समाजहितविघातक दुर्गुणांनी वरच्या वर्गाचा ऱ्हास होत चाललेला आहे. ( ४ ) त्यांतून कांही उपाय असेल तर परकीय उच्च प्रकारच्या संस्कृतीशी आमचा संबध आला यातच आहे या संस्कृतीचा व तीमुळे उपलब्ध झालेल्या साधनाचा उपयोग केल्याशिवाय राष्ट्राला तरणोपाय नाही जुन्या समजुती नाहीशा केल्या तरच लोकहीत होण्याची काहीतरी आशा आहे या जुन्या समजुती कोणत्या त्याची एक तीस कलमी याद शतपत्रापैकी नंबर ८ च्या पत्रात लोकहितवादी यानी दिलेली आहे ती अशी:—

## न. ८ वें पत्र—जुन्या समजुती.

आमचे लोकांच्या पुष्कळ मूर्खपणाच्या समजुती आहेत व इतकें ज्ञानाची प्रसृती झाली आहे, तरी लोकाचा वेडेपणा अद्याप दूर झाल नाही. माझे आढळण्यात ज्या समजुती आल्या आहेत त्याची आपल्य पत्रद्वारें एक यादी प्रसिद्ध करून असें इच्छितो की, कोणी समजदार मनुष्य असेल त्यानें त्यांविषयीं प्रतिपादन किंवा निषेध करावा. मला वाटत की, या समजुती अगदी मूर्खपणाच्या आहेत किंवा शहाणपणाच्य आहेत, याचा निश्चय झाला म्हणजे संशय जाईल.

( १ ) ब्राह्मणाशिवाय अन्य वर्णानें विद्या करू नये. संस्कृत विद्य एकीकडेच राहो. परंतु एकादा मराठा किंवा इतर जातीतील कारकू ब्राह्मणांनी पाहिला म्हणजे त्याचा तिळपापड होतो हे काय ?

( २ ) ज्ञान व विद्या वाढवू नये कारण शहाणे व वेडे एकाच दरानें विकतील असें भय बाळगतात

( ३ ) जर कोणी अपराध करून ब्राह्मणाची घरें भरली त त्यास पुण्यवान् असें समजतात. याचें उदाहरण बाजीराव पेशवे यांचे अपराध कोणी मनांत आणीत नाहीत व ब्राह्मण प्रजा त्यास योग्य मानितात.

( ४ ) देवब्राह्मणाकरिता कशीही कर्मे केली तरी चिंता नाही यास उदाहरणें, कबीरानें साधूस जेवण देण्याकरिता चोरी केली,इत्यादी

( ५ ) ज्या यंत्रानें बहुत माणसाचें काम थोडे माणसाचे हातून होतें तें चालू करू नये. म्हणजे डाक, छापखाना, टांकसाळ, हे कार खाने लोकांचें पोट बुडवणारे म्हणून त्याचा द्वेष करतात.

( ६ ) सरकार करील तें करील. सत्तेपुढें शहाणपण नाहीं.

( ७ ) सर्व गोष्टी नशिबानें घडतात. शहाणपण व उद्योग याचा उपयोग नाही.

( ८ ) सर्व सूख द्रव्यापासून आहे. त्या पलीकडे सूखही नाही व सर्व गुणाचे अधिष्ठान तेंच आहे.

( ९ ) विद्या पोट भरावयाकरिता शिकावी व श्रीमतांनी शिकणें जरूर नाही.

( १० ) देशाचार, वृद्धाचार, शिष्टाचार इत्यादीक जुन्या चालीविरुद्ध आचरण करू नये. मागील चाल चालत आली ती चालवावी याविषयी आग्रह धरितात.

( ११ ) वाईट गोष्ट असेल आणि ती चार लोकाचे पोट भरण्याचे साधन असेल तर मोडू नये.

( १२ ) घर सोडून बाहेर जात नाहीत व मुलास वगैरे घरी बाळगण्याविषयी उत्कंठा धरितात.

( १३ ) मुलें नातवडें झाली म्हणजे जन्माचे सार्थक झालें असे वडिलास वाटतें. यास्तव मुलाची लवकर लग्नें करितात.

( १४ ) इंग्रजाचे राज्यात पैशास बरकत नाही. पाऊस कमी व जरीमरी जास्त म्हणतात. व याचे कारण देवताक्षोभ झाला आहे व इंग्रजाचे कायदे व रीती वाईट आहेत म्हणून समजतात.

( १५ ) ब्राह्मणानें अपराध केला तरी त्यास शासन करू नये व त्याचें सर्वस्वी चालविण्यात महापुण्य आहे असें मानतात.

( १६ ) धष्टपुष्ट ब्राह्मणास केला तरी तो धर्म, पण आंधळ्या कुणब्यास, किंवा लगड्या ब्राह्मणास दिलें तर तो धर्म नव्हे.

( १७ ) पहिल्या लढाया व दंगे होते तेव्हां शिपायाचें पोट भरत होतें. आतां जिकडे पहावें तिकडे सामसूम झालें आहे. हें वाईट

असें कित्येकांस वाटतें. कुळवी माजले व ब्राह्मण त्यांचे बरोबर झाले हें वाईट वाटतें.

( १८ ) उद्योग न करावा हें थोरपणाचें चिन्ह. व थोरानी वेडें व भोळसर असावें व द्रव्याचा उपयोग इतकाच की, चार लोकांचें चालवावें, स्वस्थ खावें व स्नानसंध्येंत आयुष्य घालवावें. हाच थोरपणा असें समजतात.

( १९ ) संस्कृत भाषेखेरीज बाकीच्या विद्या व भाषा नर्काचें साधन आहेत.

( २० ) स्नानसंध्येचा डामडौल तो धर्मशील आणि पुण्यवान्; मग त्याची वर्तणूक कशीही असो.

( २१ ) स्त्रियाना विद्या शिकवू नये, कारण व्यभिचार वाढेल.

( २२ ) थोडा पराक्रम व थोडी ब्राह्मणांवर भक्ती केली म्हणजे ईश्वराचा अवतार म्हणून त्याची लोकांत प्रसिद्धी होते जसें शिवाजी भवानीचा अवतार, माधवराव पेशवे विष्णूचा अवतार इत्यादी.

( २३ ) मुलगा झाला तर संतोष, मुलीचा संतोष नाही अशी रूढी आहे.

( २४ ) स्त्रियाचा पुनर्विवाह करू नये. कारण की, जिच्या प्रारब्धी सूख आहे तिचा नवरा मरणार नाही जी अभागी तिचा मरतो.

( २५ ) नवसानें देव पावतो. व मनुष्याच्या सुखदुःखांवर नवग्रहाचा अमल चालतो. म्हणून त्याचे नांवानें ब्राह्मणास दानें वगैरे केली म्हणजे पीडा दूर होते.

( २६ ) स्वार्थ पहावा. लोकाची काळजी करू नये. या अर्थाची म्हण आहे की, लष्करच्या भाकऱ्या कोण भाजतो ? राजाचीं लेंकरें काय खातात याची चौकशी कशास, या समजुतींत हिंदू लोक साप्रत

परदेशातील व स्वदेशांतील वर्तमानास गैरमाहीत. पलीकडचे घरी काय होतें याची काळजी शेजारी करीत नाहीत.

( २७ ) आपल्या पाठीमागें कसें होईल याची काळजी करू नये. 'आपण मेला जग बुडाला' इत्यादी म्हणी आहेत.

( २८ ) पुष्कळ पैसा उधळला म्हणजे लोकात कीर्ती होते. मग तो पैसा कोठूनही येवो.

( २९ ) यत्किंचित् कारणाकरिता खळवाद करितात. आणि भिकारी होतात पण त्यास सोडीत नाहीत.

( ३० ) परक्याजवळ हात जोडून राहतात पण स्वकीयाशी लढतात. अशी चाल आपले लोकाची आहे. आपसांत प्राण देऊन भाडतात पण परक्याच्या लाथा सोसून नम्र राहतात.

एकूण तीस प्रश्न मी घातले आहेत ते ज्यास अमान्य असतील त्यानी लिहून कळविल्यास मला सतोष होईल परतु या समयी मूर्खपणाच्या समजुती इतक्या दृढ आहेत कीं, त्यास असे वाटते की, काय हे प्रश्न? त्याची उत्तरें काय द्यावयाची आहेत? पण तसे नव्हे या गोष्टी मोठ्या आहेत व लोकाच्या गैरसमजुती जाव्या व त्यानी सूज्ञ व्हावे, अशी इच्छा ज्यास असेल त्यासच हें पत्र आहे. इतर जे लक्ष्मीचे बधू आहेत त्याचा हिशोब व गणना आमचे मनात मुळीच नाही. ते बोलले सारखे न बोलले सारखे ही विनती. लो. हिं.

या व अशा प्रकारच्या इतर समजुतीवर अनेक प्रकारानी टीका करण्यात पुढील बहुतेक पत्रें त्यानी खर्ची घातली आहेत. व त्यात, त्याच्यामुळें आचार बिघडला हें सूत्र मुख्य धरून त्या समजुतीवर टीका करून शुद्ध आचार कसा असावा हें अनेक ठिकाणी सागितलेलें आहे. न. २८ च्या पत्राचा विषय "**विधिनिषेधरूपधर्माचे मूळ**" असा आहे. त्यात धर्म कसा पाहिजे त्याचें विवेचन व्यावहारीक

दृष्टीनें पाहताना अत्यत मार्मीक केलें आहे असे वाटतें. मनुष्यांचे एकमेकातील वैयक्तीक व सामाजीक व्यवहार नीट चालत नाहीत याचें कारण आशा, लोभ, क्रोध, इत्यादी मनाच्या प्रवृत्तीत आहे. मनुष्याला पाहिजे ते व पाहिजे तेवढे पदार्थ परमेश्वरानें फुकटच दिले असते व प्रयत्नच करण्याची जरुरी ठेविली नसती तर माणसांची एकमेकात भाडणे झाली नसती व मग कायद्यानें, नियमानी किंवा धर्मबधनानी मनुष्याचें नियत्रण करण्याचें कारणच पडले नसते. "परतु ईश्वरी सकेत असा आहे की, जसजसे पदार्थ मनुष्यास पाहिजेत तसतसे त्यानें ते निर्माण केले पाहिजेत परतू यालोकी भ्रांती व अज्ञान फार आहे, तेणेंकरून ईश्वराने मनुष्यास जे पदार्थ उद्योगाने शोधून काढण्यास सागितले आहे त्यांतून कितीएक सापडावयाचे आहेत व त्याचा अत नाही, परतु जर सर्व सापडतील तर सर्व सुखी होतील. परतु असा काळ कधी येईल तें तर्कानेंही समजणें कठीण आहे. यास्तव मनुष्यमात्राचा धर्म असा असावा की, ( त्यानी ) हे पदार्थ शोधण्याचा प्रयत्न सर्वदा करावा.

अनर्थमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधम् ।
अयोग्यः पुरुषो नास्ति योजकस्तत्रदुर्लभः ॥ १ ॥

म्हणून मनुष्यानें असा उद्योग करावा की, जितके समजेल तितकें शिकत जावें, ईश्वराने अक्कल दिली आहे या अकलेच्या जोरानें मनुष्यानी एकमेकाच्या बुद्धिबळेकरून ज्ञानाचा पाठलाग करावा. म्हणजे त्याचे पोटी सूख आहे. ही गोष्ट सिद्ध आहे. मनुष्याचें वैयक्तीक व सामाजीक कल्याण ही गोष्ट प्रयत्नानें साध्य होणारी आहे. तेव्हा प्रयत्न करण्याची बुद्धी ज्यामुळें विकास पावेल तसें करणें हें धर्माचें काम. या बुद्धीचा गैरे उपयोग लोभामुळें किंवा मोहामुळें मनुष्याच्या हातून होऊ नये एवढ्याकरितां-व केवळ एवढ्या एकच कारणाकरितां-

शास्त्र, नियम वगैरे पाहिजेत, शास्त्र लोकांचे सुखाकरिता केले आहे. शास्त्राचा मुख्य हेतू हाच आहे की, लोकामध्यें व्यवस्था व्हावी. ज्याचे त्यास मिळावे. कोणाची जबरी कोणावर होऊ नये. मालकी कायम रहावी, प्रजेनें नीट वागावे, राजाने प्रजेचे सुखावर नजर देऊन वसूल घ्यावा, जास्ती घेऊ नये, व खर्च बेताने करावा कारण लोकांचे मेहनतीचा पैसा घेऊन राजाने आपल्या सुखाकरिता व हिताकरिता व डामडौलाकरिता निरर्थक शिपाई व अमलदार बाळगणे व याजकडे खर्च करणे उचीत नाही व अयोग्य मनुष्यास कामावर न ठेवणें हाही राजाचा मुख्य धर्म होय तर धर्म म्हणजे जे नियम लोकाकरिता केले आहेत ते. व जी आपली योग्यता त्या योग्यतेप्रमाणें व्यापार करणे म्हणजे ब्राह्मण ( अर्थात् योग्यतेनें गुणानें, कर्मानें ) असल्यास विद्या व शूद्र असल्यास कृषीकर्म करणें हाच धर्म आहे व याप्रमाणे बरोबर चालून प्रतारणा न करणे व कोणास दुःख न देणें हाच पुरुषार्थ आहे. आणि धर्माचे व शास्त्राचे मूळ विचाराने हेच कळते"

धर्मसुधारणा या विषयावरील लिहिलेल्या एका पत्रात ( न. ६४ ) अशाच प्रकारचे विचार आहेत. त्यात सुधारणा कोणत्या व कशा झाल्या पाहिजेत याचें विवेचन केलेलें आहे. म्हणून त्यातील जरूरीपुरता उताराही येथेच देतो. पूर्वीच्या काळी व्यवहार बदलत तसतशी शास्त्रातही सुधारणा होत असे; अशी प्रस्तावना करून व आजच्या परिस्थितीतही याचप्रमाणें व्हावयाला हरकत नाही असें सांगून लोकहितवादी पुढे म्हणतात.—"धर्म सुधारण्याची कलमे अशी आहेत. प्रथम, सर्वांनी ईश्वराचे भजन अंतःकरणापासून करीत जावें. दुसरें, जसा आपला जीव तसा दुसऱ्याचा जीव मानावा. तिसरें, मुंज, लग्न, प्रेतक्रिया हे तीन संस्कार ठेवून बाकीचे रद्द करावे. चवथें, जें कर्म करावयाचें तें स्वभाषेंत अर्थ समजेल असें करावें. भजन पूजन संस्कार सर्व ज्याचे

त्याचे भाषेंत करावे. सस्कृत भाषा पाहिजे ते शिकवितील. परतु ज्यास येत नाही, त्यानी सस्कृत भाषेंत कोणतें कर्म करण्याची जरूरी नाही. प्रत्येकास आपले विचाराप्रमाणें आचार करण्याची व बोलण्या-लिहिण्याची मोकळीक असावी. प्रतिबध असू नये. पांचवें, स्त्री-पुरुषाचे अधिकार धर्मसबधी कामात व ससारात एकसारखे असावे येणेंकरून पुनर्विवाह व मोठेपणी लग्न झालें. सहावें, आचारापेक्षा नीती प्रमूख असावी. आचाराचे महत्व हल्ली आहे तसे असू नये. आता कितीएक बायका लबाड असतात, परतू पिपळाच्या प्रदक्षिणा अतरत नाहीत हें कांही उपयोगी नाही. सातवे, अर्थाशिवाय काही-एक म्हणू नये. आठवें, मनुष्यमात्रास तुच्छ मानू नये. जाति-अभिमान नसावा. सर्वांशी सारखे दयापूर्वक वर्तावें सर्वांचें कल्याण करावें. नववें, स्वदेशाची प्रीती व त्याचे कल्याण विशेषकरून मनांत वागवावें. दहावें, ज्यास जो पाहिजे तो त्यानें रोजगार करावा. अकरावें, गुणेंकरून व योग्यतेवरून जातिभेद मानावा. कुळेकरून मानूं नये. बारावें, सरकाराहून प्रजेचे अधिकार अधीक असावे. म्हणजे जे जे रयतेच्या हिताचे कायदे आहेत ते सरकाराशी भांडून घेत जावे. तेरावे, राजाने जे नियम केले असतील ते व जे ईश्वरीबुद्धिसूचीत नेम आहेत, ते मानावे. चवदावें, विद्यावृद्धीकरिता सर्वांनी मेहनत करावी. दुःखितास सूख, रोग्यास औषध, मूर्खास ज्ञान व दरिद्यास शक्त्यनुसार द्रव्य देण्यास अतर करू नये. पधरावें व शेवटचें कलम असे आहे की, सर्वांनी सत्याने वागावें. विद्येमध्यें ज्या ज्या गोष्टी शक्य आहेत, त्याचा शोध करण्यास आळस करू नये. आणि सापडतील त्या सर्व प्रसिद्ध कराव्यात. विद्या व ज्ञान सपादन करण्यास सर्व सारखे अशी मोकळीक असावी. याप्रमाणें धर्म सुधारणा केली असतां आपसातील तटेभांडणें मोडून "लोक गगाजळ-

चत् निर्मळ होतील व त्याचे एक मत व एक धर्म होईल. व जें पाहिजे ते करता येईल. असे केल्यावाचून साप्रतकाळी हिदूधर्म भ्रष्ट झाला. त्याचे हातून आम्ही सुटणार नाही. हा धर्म सुधारला पाहिजे.... माझे म्हणण्याचा हेतू इतकाच की, विरोध मोडावे आणि लोकांनी परस्पर ममतेनें वागावे. व जसजसे कालेंकरून हे अज्ञानपाश सुटतील तसतसे सोडवावे. परतु या कार्यास आरभ करावा म्हणजे बरे पडेल. बहूत लोक वाट पाहतात. ब्राह्मण महाराची निंदा करतात व त्यास शिवत नाहीत व इग्रजाजवळ प्रीतीनें बसतात हे पाहून मला आश्चर्य वाटते शास्त्राप्रमाणें पाहिलें असता महार हे बरे, परतु इग्रजाचे मडळीत ब्राह्मण असू नयेत. तत्रापी हे ब्राह्मण मूर्ख त्यास समजत नाही म्हणून मी हा पाया योजिला आहे.

धर्म सुधारला तर आचार सुधारेल. पण धर्म सुधारावयाचा म्हणजे लोकाच्या खोट्या समजुती गेल्या पाहिजेत. जुन्याचा फाजील अभिमान नाहीसा झाला पाहिजे. म्हणून नवीन विद्या, नवीन शिक्षण ही पाहिजेत जुनी सस्कृत विद्या निरुपयोगी आहे. तिला लोकांनी किंवा सरकारने उत्तेजन न देता पैसा नवीन इग्रजी विद्येवर खर्च केला पाहिजे व हे पाश्चात्य ज्ञान देशी भाषेत पुस्तके लिहून आणविलें पाहिजे असें लोकहितवादी याचे मत होतें. या प्रकरणी त्याची ७।८ पत्रे शतपत्रांत आहेत त्याचा थोडक्यात साराश येथें देतों. ब्राह्मणी विद्या, जुनी विद्या किंवा सस्कृत विद्या या नावानी जी विद्या त्या काळी आमच्या लोकात रूढ होती, तिच्यावर लोकहितवादीचा मुख्य आक्षेप म्हणजे, ती केवळ शाब्दीक होती, हा आहे. जें शिकणें तें अर्थ समजून शिकलें तर त्याचा उपयोग, नाही तर पोपटासारखें शिकण्यांत अर्थ नाही असे त्यांना वाटे व तें रास्तच वाटे. पण सभोवतालचे भटाभिक्षूक पाहिले म्हणजे त्याना अर्थाची काही चाड

नाही उलट वेदांचा, शास्त्रांचा अर्थ करणें म्हणजे पाप अशी त्यांची समजूत होती. इतकेंच नाही तर ती समजूत चुकीची आहे असे कोणी सांगितलेलेंही त्याना खपत नसे. हा सर्व प्रकार पाहून ते सतापत व कित्येक वेळां कडकपणाने, दुसऱ्याचें मन दुखेल अशा रीतीनें लिहीत. हे लेख लिहिले त्यावेळी वेदविद्येच्या अभिमान्यांचा दुरभिमान कोणत्या थराला जाईल त्याचा प्रत्यक्ष अनुभव लोकहितवादीना आला नव्हता. तो पुढे आला. पुण्यातील दक्षिणा व जुनी पाठशाळा बद होऊन इग्रजी कॉलेज झालें त्या वेळी गोपाळराव प्रभृती मडळीनी दक्षिणेचे पैसे देशी भाषेंतून पुस्तकें तयार करण्याकडे लावावेत असा अर्ज केला होता. व त्या कामात ग्रामण्य वगैरे भानगडी उपस्थीत झाल्या व त्याना बराच त्रास झाला, वगैरे हकीकत मागे त्याच्या चरित्रात आली आहे. तो प्रकार पुढे १८६० च्या सुमारास झाला. पत्रें त्यापूर्वी १० वर्षाची म्हणजे १८४९ सालातील आहेत. त्या वेळीही त्याची मते ठाम तयार झाली होती असे त्या पत्रावरून उघड दिसते. एका पत्राचा विषय, **'सस्कृत विद्या'** असा आहे. (पत्र न. ८४) यात सस्कृत म्हणजे सस्कारावरून शुद्ध केलेली भाषा ती सस्कृत असा शब्दाचा अर्थ करून पुढें त्या भाषेंत जे ज्ञान आहे त्याचा आजच्या काळी फारसा उपयोग नाही अशा मताचें प्रतिपादन केले आहे. त्या भाषेंतील ग्रथांत ज्ञान फारसें नाहीं. आहे तें केवळ जुन्या काळचे त्याचा आता काही उपयोग नाही. या ज्ञानाचे चार प्रकार आहेत. एक वेद किंवा सहिता, ब्राह्मणें, उपनिषदें वगैरे. यापैकीं साहितेंत अग्नी, मित्रावरुण इत्यादि देवदेवाची स्तुती, छदांत केलेली असून ब्राह्मणें या भागांत या मत्राचा विनियोग सागितला आहे. म्हणजे यज्ञयाग वगैरे करितांना कोणत्या मत्रांचा उपयोग करावा, कसा करावा वगैरे गोष्टींचें वर्णन केलें आहे. संहिता व ब्राह्मणें ही

ब्राह्मण जातीच्या हातात टाकल्यामुळें व यज्ञयाग इत्यादी कृत्यानीं ब्राह्मण कोणतीही गोष्ट घडवून आणतील असा धाक इतराना वाटत असल्यामुळें त्याचें वर्चस्व हजारों वर्षे राहिलें. संस्कृतविद्येचा दुसरा भाग म्हणजे शास्त्रें व नानाप्रकारची मतें. वेदात, बौद्ध, ब्राह्मणमत, पुराणें वगैरे ग्रथ झाले. वेदात्यानी कर्मठपणा खोटा आहे असे ठरवून ब्रह्मविचाराला चालन दिले. बौद्धानी यज्ञयागातील क्रूर प्रकारांची टर उडवून दयाभूत धर्म आहे असे प्रतिपादन केले. नतर ब्राह्मणमताचे पुनरुज्जीवन झालें त्यात दया, भक्ती, ब्रह्मज्ञान, कर्मठपणा इत्यादी सर्वच गोष्टीची भेसळ करून सर्वांचा संग्रह करण्याचा प्रयत्न केला होता. या सर्वांचें नाव जुनी संस्कृत विद्या आता या विद्येचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग पाहू लागलें तर काही नाही. कारण हें सर्व ज्ञान जुनें, मिथ्या व काल्पनीक आहे. वैदिकाला यज्ञात पशू कसे मारावे, मडपाचे तोड कोणत्या दिशेस असावे या गोष्टीचा खल करण्यात सर्वस्व आहे असें वाटते ज्योतिष्याची दृष्टी शनिमगळाच्या पीडा व त्यांची दानें याच्या पलीकडे जात नाही नैय्यायीक, मीमासक हे काल्पनीक पदार्थाची चिकित्सा करीत बसून जग मिथ्या आहे का सत्य आहे, या भ्रांतीत पडतात. मत्र, जादूटोणा, जपतपें याच्या मागें लागलेले ब्राह्मण त्यातच गुग असतात याप्रमाणें संस्कृत विद्या निरुपयोगी व नाना प्रकारचे कुतर्क उत्पन्न करणारी, ससारावरील चित्त उडवून आळशी करणारी व निरुपयोगी कर्मे करविणारी आहे. साप्रतकाली जें ज्ञान पाहिजे तें त्यात मुळीच नाही. साप्रत काळचे देश, राज्यें, व्यापार, फौजा इत्यादिकाची माहिती, यत्राची उत्पत्ती, कायदेकानू कसे असावे, गैरचाली कोणत्या आहेत, टाकाव्या कोणत्या, ठेवाव्या कोणत्या, हा विचार त्यांस माहीत नसतो. "जोंपर्यंत बाहेरचे देशांतील लोकांचें वर्तमान लोकास ठाऊक नव्हतें" तोंपर्यंत जुन्याची

सद्दी चालली होती हें ठीकच झाले. परतु आता बाहेरचें ज्ञान या देशात शिरलें त्याचे पुरानें जुनें ज्ञान वाहून गेलें त्याची तुच्छता अगदी स्पष्ट झाली. पाठीमागून पोकळ ढोंग चालत आलें, त्याचा पोकळपणा उघडकीस येऊन त्या ढोंगावर पोट भरण्याचे महत्व कमी झाले तर आता ज्यास थोरपणा पाहिजे असेल त्यानी सांप्रत काळच्या ज्ञानाची सपदा मिळवण्याचा प्रयत्न करावा. ज्या ज्ञानानें इतर लोकानी आपली सरशी केली तें ज्ञान आपण धिक्कारू नये. कारण की, आपणास त्याचा अनुभव आला आहे. याजकरता सावधगिरीचें लक्षण हेंच की, काळास ओळखून त्याप्रमाणे करावें, असे न केलें तर फार फजीत होऊन दुर्दशा झाली आहे, त्यापेक्षा अधीक होण्याचा सभव आहे पूर्वी जुन्या काळचे ब्राह्मण म्हणजे ऋषी वगैरे यानी अपुरती कामे ठेवली ती आपण पुरतीं करावी. त्यानी वैद्यक पूर्णतेस आणले नाही तर आता आपण अनेक देशाच्या कल्पना एके ठायी करून नवे शोध करून ते सुधारावें म्हणजे खरा थोरपणा मिळेल व लोकाचें हीत होईल. असे न होईल तर लोक वैद्यास सोडून नवे डाक्टर, नवी इस्पितळे याचा आश्रय करतील. आणि पुराणे वैद्य बिचारे उपाशी मरतील याचप्रमाणे सर्व विद्याचें आहे."

न. ६२ व न. ६३ ही दोन पत्रे याच विषयावरील आहेत. ब्राह्मणाची शिक्षणपद्धती, विशेषतः अर्थावाचून पाठ करणें या दृष्टीनें या पत्रांतून विचार केला आहे. पदे, क्रम, जटापाठ, घनपाठ, उलट-सुलट पदे म्हणणें, पोथीवाचून पदें म्हणणें, व म्हणता येण्यात भूषण मानणें इत्यादी प्रकारांचा विचार यांत केला आहे. यातील विचार खोट्या अभिमानाच्या दृष्टीनें पाहणाराला झोंबणारे असले तरी यथार्थ दिसतात. ब्राह्मणाच्या मुलाचें लहानपणचें शिक्षण म्हणजे लिहिणें वाचणें शिकणे व थोडेंसें वेदपठण करणें एवढें त्या काळीं असे.

व एवढें झालें की, मुलगा शिकला असें बापाला वाटू लागून तो आपल्याला धन्य मानी. या स्थितीला अनुलक्षून लोकहितवादी म्हणतात. " वेदाचा अर्थ करू नये, पुराणें, शास्त्रे ब्राह्मणाखेरीज कोणी वाचू नयेत, परदेशांत गेलें तर भ्रष्ट होतो, अशा नाना प्रकारच्या समजुती त्यांच्या पाहून ते शतमूर्ख होतात. अशी थोर, श्रीमताची मुलें मला पुण्यात शेंकडों आढळतात व मोठाले वयोवृद्ध कित्येक आहेत त्याची तर सख्याच नाही. वर्तमानपत्रे व बुके या द्वारानें ज्ञान मिळवणें हें तर त्याचे कुळाचे शत्रू. व वाचणे व लिहिणे त्याचे बापाचे वैरी. असे लोक आहेत. यास ईश्वर कोणत्या रीतीनें ताळ्यावर आणील ते आणो. मला वाटतें की, ब्राह्मणाची मुज झाली की त्यास विद्या पढवावी. काही चागले ग्रथ नवीन पद्धतीचे करून त्यात नीती व ईश्वरभजनाच्या गोष्टी घालून व इतर भूगोल व खगोल वास्तवीक आहेत, अशा गोष्टी लिहून ते ग्रंथ पढवीत जावे. म्हणजे मूर्खपणा जाऊन तो मुलगा चागला तयार होईल. असे ग्रथ कोणीतरी केले पाहिजेत. शास्त्री पडीत व यास होय म्हणणारे गृहस्थ काय बोलतात, हें त्याचें त्यास देखील कळत नाही. कोणी म्हणतात की, इग्रज लोक हे वानर आहेत. तेव्हा माझे मनात येते की, तुम्हीं बोलतां ते डुकर आहांत. यांस फक्त पाठ करणें ठाऊक आहे. कोणी जुन्या ठशाचे लोक शख करतात की, जुनी वेदविद्या बुडाली, पण महाराज ही विद्या हवी कोणास ? पाठ करावयाची ही विद्या कोणत्याही देशात नाही. एक अक्षर उलटें सुलटे मागे पुढें पाठ केलें म्हणजे काही दूध निघतें काय ? "

न. ६९ च्या पत्रांत हाच विषय पुन्हा घेऊन इग्रजी व संस्कृत विद्याची तुलना केली आहे. केवळ सस्कृत वाचून उपयोगी ज्ञान मिळणार नाही, अशा तऱ्हेची प्रस्तावना करून लोकहितवादी

म्हणतात:—मला निश्चयें करून वाटतें की, ज्याला शहाणपणा व ज्ञान मिळवावयाचें असेल त्यानें इंग्रजी भाषा व त्या भाषेंतील ग्रंथाचे तर्जुमे तरी वाचीत जावें म्हणजे त्यास पुष्कळ गोष्टी कळतील. आतां इंग्रजी विद्या फार सुधारली आहे. त्याजमुळें त्यांतील भूगोलावर एक ग्रंथ पढलेला व संस्कृत किंवा इतर भाषेंत सर्व जमा केले तर एकाची बरोबरी व्हावयाची नाहीं असें आहे. कारण इंग्रज लोकानी विद्या फार सुधारल्या, यांजमुळें त्या शुद्ध आहेत. आणि पूर्वींच्या काळी शोध कमी होते. यामुळें विद्या अर्धवट झाल्या व त्या तितक्याच राहिल्या आहेत. केवळ संस्कृतीनेंच मनुष्य ज्ञानी किंवा शहाणा होईल असें नाहीं. व हें एक संस्कृताचे धोरण आहे की, संस्कृत पढलेले भ्रमिष्ट, मताभिमानी, अर्थाचा अनर्थ करणारे असे असतात— आता संस्कृतात स्वधर्म आहे. याजकरितां याचें ज्ञान असणे जरूर आहे, परंतु तितक्या पुरतें संस्कृत शिकावें, त्यातील शास्त्र फार पाहिल्याने बुद्धीचा विपर्यास होतो.

जुन्या व नव्या विद्यांची याप्रमाणे तुलना करून नवीन विद्या श्रेष्ठ, जास्त उपयोगी असें ठरविल्यावर ती आमच्या लोकानी मिळवावी कशी याबद्दल लोकहितवादी यानी कांहीं उपाय सुचविले आहेत. त्यातला एक असा की, देशी भाषांतून नवीन ग्रंथ तयार करवून घेऊन ते शाळांतून शिकवावे व मोठ्या लोकानी वाचावे. त्याच्या पिढीचे मोठे लोक संसारात पडून पोट भरण्याच्या मार्गाला आधीच लागलेले होते. ते यापुढें नवीन कांहीं तरी शिकतील अशी फारशी आशा नव्हती. तरूण पिढीच्या हातूनच काही झालें तर होईल यावर आमची आशा आहे असें ते म्हणत असत. म्हणून पुढें ते म्हणतात:—“याकरिता विद्याभ्यास जो करविणें तो चांगली समजूत पटेल, लोक विचार करणारे होतील अशा प्रकारचे त्यास

पंतोजी व शाळा पाहिजेत. जी भाषा व जे ग्रथ प्रथम मुलाचे हाती पडतात व ज्या मनुष्याची सगत त्यास असते तशी त्याची समजूत होते. यास्तव मुलास ग्रथ वाचावयास द्यावयाचे ते प्रथम चागले पाहिजेत. त्यांस सुबुद्धी होऊन त्याची समजूत चागली पटावी व त्यांनी बहुत वाचण्यावर लक्ष द्यावें व त्याच्या मनांत जुन्या.... ज्या समजुती येतात त्या सर्व लबाड असें त्यास भासलें पाहिजे. व त्यास ग्रथाची गोडी लागून ग्रथ वाचावे असें त्यास वाटलें पाहिजे. ग्रथ करणारास आजकाल या देशात खप नाहीं. ग्रथ करून त्यास विकत घेणार मिळविणें म्हणजे मोठा प्रयत्न पडतो. जुलमानें व बळानें ते लोकाचे गळीं बांधावे लागतात त्याजबद्दल किमत देणें म्हणजे लोकास असें वाटतें की हा पैसा व्यर्थ आहे. यात पुण्य नाही व धर्म नाही याप्रमाणें हे लोक दुर्भाग्य आहेत याचा काळ विपरीत म्हणून अशी बुद्धी झाली हे तर उघड आहे. परतु लोक असें समजतील तर बरें. या देशात ग्रथ छापणारास पैसा द्यावा हें उत्तम आहे, हाच धर्म आहे हे मूर्खास शहाणे करण्याचे काम हाच श्रेष्ठ धर्म आहे. असे झाल्यावाचून लोक सुधारणार नाहीत.—पत्र न ९३.

सामान्य लोक ज्याला धर्म धर्म असे समजतात त्या प्रकारच्या कर्मठपणाचा एक परिणाम किंवा दुष्परिणाम म्हणून जो लोकहित-वादींनी सांगितला आहे तो म्हणजे या देशांतील लोकांची सासारिक गोष्टींविषयी फाजील विरक्ती व त्यामुळें भौतीक सुखसोयी व भौतीक सपत्ती देशांत ज्या योगानें वाढेल अशा तऱ्हेच्या उद्योग-धद्यांविषयी लोकांची अनास्था. जग मिथ्या आहे तेव्हां ऐहीक सुखें म्हणजे दुःखाचें मूळ, त्याचा त्याग केला पाहिजे अशी मनाची एकदा समजूत झाली म्हणजे उद्योग करून सपत्ती मिळवावी व तिचा व्यय करावा याविषयीं मनुष्य साहजीकच बेफिकीर होतो. वैराग्यवृत्ती

ही उद्योगीपणाशी अगदी विसगत आहे, व आमच्या अशा वृत्ती-मुळेंच उद्योगधद्याकडे, व्यापाराकडे किंवा धाडस आणि जूट ही ज्यांत लागतात अशा प्रकारच्या उद्योगांकडे आमचे लक्ष लागत नाही. यामुळें आमचा देश भौतीक सपत्तीने दरिद्री आहे व त्यामुळेंच पराधीनही आहे. अशाच प्रकारची मीमासा लोकहितवादींनीही केली आहे.

एका पत्रात हिंदुस्थानच्या पराधीनतेची कारणे सागताना उद्योगधद्याचा अभाव हें कारण सागून ते पुढें असें म्हणतातः—चाकू, कात्री, सुरी इत्यादि लहान सहान पदार्थ देखील आपल्याला चागले तयार करिता येत नाहीत. कारण यत्रज्ञान नाही व देशातील बुद्धिवान लोकाचा कल तें करून घेण्याकडे नाही व यामुळे एकीकडे पुष्कळसे लोक केवळ शब्दपांडित्याच्याच विद्या शिकून याचकवृत्तीनें कसेतरी पोट भरतात, तर दुसरीकडे परदेशचे लोक येथें येऊन सहजासहजीं लाखो रुपये व्यापारांत मिळवून परत जातात. अशी स्थिती दिसते. ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, शूद्र हे पूर्वीचे चार वर्ण गुणकर्मांने झालेले होते. त्या वेळी ब्राह्मण विद्याभ्यासग करीत, वैश्य व्यापार करीत वगैरे व्यवस्था असे. आता हल्ली ही वर्णव्यवस्था मोडली आहे. ब्राह्मण पोटभरू झाले आहेत, क्षात्रिय लोपले व वैश्य परदेशाशी व्यापार वगैरे करीत नाहीत तर उलट सर्वांनाच नौकरी करून पोटाला मिळवण्यात प्रतिष्ठा वाटते. तेव्हा सर्व शूद्रत्त्वाला पोचले काय ? अशा प्रकारची खोचदार विचार-मालिका एका निबधांत व्यक्त केलेली आहे. त्याप्रमाणे एखादी जागा सरकारी नोकरीत रिकामी झाली तर त्या ठिकाणी हजारो अर्ज येतात. वर्षानुवर्ष वरिष्ठ अमलदाराच्या घरी खेटे घालण्यात उमेदवारांना लाज वाटत नाहीं. यापेक्षा कांहीतरी व्यापार उद्योगधदे करून पोट भरणें स्वाभिमानाला जास्त पोषक होईल असें त्यांचें म्हणणे आहे. देशातील शिकलेले लोक व्यापार उद्योगधदे करू लागले म्हणजे त्या

निमित्तानें त्याचें बाहेर देशांशीं दळणवळण वाढून निरनिराळ्या चाली-रीती, राज्य करण्याच्या पद्धती वगैरेंचे ज्ञान त्याना होईल व कला-कौशल्य, ज्ञान व संपत्ती याची संपादणी आमच्या लोकानी केल्यावर आज राज्यकर्ते जे आम्हांला तुच्छ मानतात तसे ते पुढें लेखणार नाहीत व त्या प्रकारानें लोकाची उन्नतीही होईल असे त्याचे मत होते पण हें सर्व घडून येणें इंग्रजी राज्य व इंग्रज लोकाचा सहवास यामुळेच शक्य झालेले आहे पूर्वीच्या काळीं या गोष्टी कोणी मनात आणिल्या नसत्या किंवा कोणास बोलून दाखविता आल्या नसत्या, करणे तर लांबच राहिले म्हणून इंग्रजाचा सहवास ईश्वरी कृपेमुळे या देशाला प्राप्त झाला आहे असें आपण समजले पाहिजे असे ते म्हणत. पेशवाईच्या अखेरच्या काळात त्या बेबंदशाहीतून, पेंढाऱ्याच्या व ठगाच्या उपद्रवातून, बाहेर पडून नुकत्याच समाधान व शातता अनुभवू लागलेल्या पिढीतील एका पुरुषाचे हे विचार आहेत एवढी गोष्ट लक्षात ठेविली म्हणजे आज कसल्याही स्वराज्याची स्तुती करणाऱ्या आमच्या पिढीलाही त्यात हसण्याजोगे कांहीं दिसणार नाहीं असे वाटते. लोकहितवादी याच्या ग्रंथातून जरूर तेवढे एकदोन उतारे वरील मताच्या समर्थनाला उपयोगी पडतील असे येथें देतो.

**उद्योगप्रशंसा, कमती कशाची, निरुद्योगीपणाच्या चाली, ब्राह्मणांच्या चालीरीती** वगैरे विषयावर लिहिलेल्या पत्रातून तीच तीच मतें पुन्हा पुन्हा सांगितली आहेत. त्यापैकी ४४ नंबरचे पत्र विशेष महत्त्वाचें आहे म्हणून उतारा यातूनच घेतला आहे. पत्राचा विषय **'हिंदु लोकांनी उद्योग करण्याची अवश्यकता'** असा आहे. पूर्वी या देशांत लोक थोडे व समृद्धी जास्त अशी स्थिती असल्यामुळे प्रजा सुखी होती. आज लोक पुष्कळ, पण पूर्वीच्या सुखासमाधानाच्या काळात उत्पन्न झालेल्या, निरुपयोगीपणाच्या, कालक्रमणाच्या किंवा

कालापव्ययाच्या चाली मात्र रूढ आहेत त्या आहेतच. त्यांमुळें दारिद्य वाढत आहे. अशी प्रस्तावना करून लोकहितवादी पुढे म्हणतात:—"सर्व आळशी लोकास पुरेल अशी समृद्धी या देशात नाही. जसें एका घरात दहा मनुष्याचें अन्न असते, तेथे पचवीस पाहुणे आले म्हणजे घरच्या माणसानी उपाशी रहावे तरच पाहुण्याचा काही निर्वाह होईल, तशीच या देशाची हली स्थिती आहे. पहिल्याने मुसलमान लोक व मग इंग्रज या देशात आले—बाहेरचे जे येतात ते काही मेहनत करावयास येत नाहीत. ते आयते खावयास येतात. इंग्रज आले त्यानी—सुखाच्या जागा, मोठी कामें काजें उपटली. हजारों इंग्रज लोक व हजारो शिपाई इकडे येऊन अमीराप्रमाणे राहतात. इतक्या या लोकाचे पोषण हिंदू लोकाचे मेहनतीनें जे उत्पन्न व्हावयाचे त्यातूनच होतें. वास्तवीक म्हटलें तर पाहुणे आले त्यानी उपाशी रहावे. पण हे साधारण पाहुणे नव्हत तर ते शूर, विद्वान, गुणी व जबरदस्त आहेत. तेव्हा आपले लोकापुढे ठेवलेल्या पत्रावळी त्यानी ओढल्या आणि हे लोक त्याचे तोंडाकडे पहात बसले. .. त्यामुळे हे लोक भिकारी झाले आहेत. अमीरपणा, शिपाईगिरी, राज्यकारभार या लोकाकडे होता, तेव्हा कोणतेंही प्रकारे दुर्भिक्ष नव्हते. .. परतू या देशातील कामे व व्यापार इंग्रज लोकानी घेतले. जडज तेच, मॅजिस्ट्रेट तेच, वस्त्रें विकणारे तेच माल आणणारे तेच, टाकसाळ घालणारे तेच, व शिपाई तेच. इतक्या लोकाची कामें पूर्वी आमचे मध्यें होती तें टाकून होतें. परतु तीं सर्व त्याचे हाती गेली. तेव्हा ज्या ज्या लोकांची कार्ये त्यानी घेतली ते ते लोक रिकामे झाले. आणि उपाशी मरू लागले. . .असा प्रसग आला. तेव्हां आपले लोकास सुखी होण्याची युक्ती कोणती म्हणाल तर अशी आहे.

याजकरिता या लोकांनी विद्या व ज्ञान याचे प्राप्तीस झटावें. व इंग्रजाप्रमाणे शहाणें व्हावें आणि जे व्यापार ते करतात ते आपण करावेत. कोणी म्हणतील की, त्यांस द्रव्य अनुकूल आहे आणि या लोकाजवळ द्रव्याची अनुकूलता नाही तर ही गोष्ट खरी आहे. परंतु त्याचा निर्णय आज लिहिणे जरूर नाही जेव्हा सर्व लोक पुढें सरावे अशी इच्छा करतील व रानटीपणाच्या समजुती सोडून देतील तेव्हा अनुकूलता सहज होईल." याचसंबधानें या देशातील लोकाचें दारिद्र्य नाहींसे कसें होईल असा विचार करीत असताना काही मार्मीक विचार त्यानी प्रसिद्ध केले आहेत ते या ठिकाणी देतों. हे विचार १८५० तील म्हणजे सार्वजनीक काकांची पुण्यातील स्वदेशी सुरू होण्यापूर्वी काढलेले आहेत. नं. ६० च्या पत्रात लोकहितवादी म्हणतात.—"दुसरा तूर्त दारिद्र्य मोडण्यास उपाय असा आहे की, ब्राह्मण लोकानी आपल्या मूर्खपणाच्या समजुती सोडाव्या आणि केवळ कारकून आणि भट हे दोनच रोजगार आम्ही करू असें म्हणू नये या देशांत आणखी पुष्कळ रोजगार आहेत व तेही आता दिवसेंदिवस इंग्रज घेत चालले. सावकारी, शेतकी वगैरे इंग्रज करू लागले, हेच रोजगार आपले लोकानीं करावेत कोणते म्हणाल तर काच, कापड, सुरी, कात्री, लाकडी सामान, घड्याळें, चाबूक, यंत्रें इत्यादि पुष्कळ पदार्थ इंग्रज इकडे खपवितात. ही सर्व आपले लोकानी करावयास शिकावें व येथे जो माल खपणार नाही तो दुसऱ्या देशास घेऊन जावा आणि तेथें विकावा. पुष्कळ देश आहेत या गोष्टीचा शोध करावा व इंग्रजाचे देशाचें सामान बंद करावें. किंबहुना आपलें सामान त्यांस द्यावें. परंतु त्याचें आपण घेऊ नये. जो इकडे उत्पन्न होईल तितका माल घ्यावा. विलायती कापड घेऊ नये. यापेतव आपल्यास जाडीभरडी कापडें

नेसावयास लागली तर काय चिंता आहे ! परंतु आपले देशाचें रक्षण करावें. असें झाले म्हणजे बहुत रोजगार रहातील, परंतू हें या लोकास सुचत नाही. यास असें वाटतें की, आजपर्यंत आपण केले नाही ते पुढे करणार नाही व भलताच रोजगार करणार नाही. दहाबरोबर मरण लग्नासमान आहे, असें ते मानतात, आणि उपाशी मरतात भट पन्नास हजार खेपा घालतात तेव्हा एक श्राद्धाचे आमंत्रण येते. तसेच शंभर धक्के कोंडीत खातात तेव्हा दोन पैसे दक्षिणा मिळवतात, चोरालबाडाची स्तुती करतात तेव्हा चार पैसे काढतात दारू पिणारानें शुद्ध व्हावयास पैसा दिला म्हणजे त्यास शुद्ध करतात. सांप्रत ब्राह्मण पैसा दिला म्हणजे कोणतेंही दुष्कर्म करावयास सोडीत नाहीत तसेंच उमेदवार, कारकून शंभर खेपा घालतील तेव्हा दप्तरदाराची भेट, पांचशे खेपा घालतील तेव्हा तो या म्हणतो. मग पंचवीस वर्षे गावात भीक मागून त्याचे घरी काम करावे. चाकरी क्वचित् कोठें येणार व मग ती प्रथम आपल्या सोयऱ्याधायऱ्यास देणार म्हणजे सर्व उमेदवारांनी हात आपटीत बसावे असे त्याचे हाल होतात व माणसे अशी जिकीरीस येतात ती पाहवत नाहीत. यास्तव यांनी स्वस्थपणाने दुसरे रोजगार करावे. म्हणजे इंग्रज लोकांच्या शिरस्तेदाराच्या शिव्या, भटाचा अपमान हे काही सोसावयास नको ”

प्रभाकर, १३ मे १८४९ लोकहितवादी.

देशी उद्योगधंद्याविषयींची ही विचारसरणी सामान्यतः बरोबर असली तरी त्यात एक मोठा दोष आहे. कारकुनी पेशाचे किंवा मानसीक श्रमाचे धंदे सोडून कारागिरीचे धंदे करण्याला या देशातील लोकांनी सुरवात केली म्हणजे देशाची उर्जितावस्था एकदम

होण्यास उशीर नाही, अशा तऱ्हेची समजूत लोकहितवादींची होती. ही समजूत चुकीची आहे. वाफ व वीज या दोन प्रचंड शक्तींचा शोध लागून त्यांचा उपयोग उद्योगधंद्यांकडे होण्याची एकदा सुरवात झाल्यानंतर या नवीन परिस्थितीत मानसीक श्रमाचे, पांढरपेशा वर्गाचे धंदे व उदीम, व्यापार, कारखाने, या दोहोंतही बुद्धिमत्ता सारखीच लागते. एखाद्या मोठ्या कारखान्याची हल्लींच्या दिवसांत उभारणी करावयाची तर भांडवल मिळविण्यापासून तो कच्चा माल, मजूर, व्यवस्था, विक्रणें, या सर्व गोष्टी पूर्ण होईपर्यंत व्यवस्था करावयाची म्हणजे कारखान्याचा मालक किंवा व्यवस्थापक जो कोणी असेल त्याच्या आंगी बुद्धि-मत्ता, ज्ञान, अनुभव, धोरण हे गुण फार वरच्या प्रतीचे असले तरच चढाओढीत त्या कारखान्याचा टिकाव लागतो, अशी आज वस्तु-स्थिती आहे. यामुळेच युरोपांतील सुधारलेल्या देशांत, विश्वविद्या-लयांचे जुने स्वरूप बदलून त्यांना नवीन स्वरूप प्राप्त झालेलें आहे, व नवीन प्रकारची विद्यालयें (औद्योगीक) स्थापन झाली आहेत आणि होत आहेत. विद्यालयें व कारखाने यांचे संबंध जास्त निकट झालेले आहेत. शारीरीक श्रमाच्या व्यवसायांत लक्ष घालणे म्हणजे सुशिक्षीत माणसाला कमीपणाचे तर वाटत नाहींच, उलट विश्व-विद्यालयांतील मोठमोठ्या विद्वानांना देखील अशा कामाकडे आपले बुद्धीसर्वस्व खर्च करणें हें एक राष्ट्रीय कर्तव्य आहे असें वाटतें. या दृष्टीने पहातां पांढरपेशा मंडळींनी आपले व्यवसाय सोडून "घिसाडकामाकडे" मोर्चा फिरविला म्हणजे देशांतील दारिद्र्य एकदम नाहींसें होईल ही कल्पना व्यर्थ आहे असें वाटतें. पण या गोष्टी आज जवळजवळ एका शतकाच्या अनुभवाने आम्हांला कळ-तात. त्या लोकहितवादींना त्या काळांत कळल्या नाहींत म्हणून आम्ही त्यांना दोष देत नाहीं. आज देखील तशाच प्रकारची

मतें व्यक्त केली जातात. त्याची वास्तवीक किमत कळावी एवढ्याच- करिता हें थोडेसे विषयातर केले आहे.

इग्रजाचा सहवास परमेश्वर कृपेनेंच या देशांतील लोकास झाला आहे असा लोकहितवादीचा दृढविश्वास होता व तो त्याच्या पत्रांतून व लेखांतून अनेक ठिकाणी व्यक्त झालेला आहे. त्याचप्रमाणें इग्रज लोकांपासून आमचे लोक शहाणपण शिकतील व आपला राज्य- कारभार आपण पाहण्याची हिमतही लवकरच त्याचे अगी येईल असें त्याना वाटत असे. ४६ नबरचे पत्र या विषयावर आहे. त्यात ते म्हणतातः—“इग्रज लोक यानी इकडे राज्य सपादन केलें त्याचे कारण काय, याचा विचार करिता दिसते की, हिंदू लोकामध्यें मूर्ख- पणा वाढला तो दूर होण्याकरिताच हे गुरू दूर देशातून ईश्वराने इकडे पाठविले आहेत. पहा, हिंदू लोकांस हा मोठा लाभ आहे की, इग्रज लोकाचे राज्यामुळें हिंदू लोकात जागृती झाली व पृथ्वीवर काय काय आहे हें कळू लागले. ज्यास कोंकणापासून पुण्यापर्यंत प्रदेश ठाऊक त्यास पूर्वीचे लोक मोठा माहीतगार असे म्हणत, परतु आता बहुतास इग्रजांचा प्रदेश, इग्लड व अमेरिका माहीत झाली हें सर्व इग्रजामुळें झाले ईश्वरानें ही शहाणपणानेंच योजना केली आहे लोकांची झोंप जाण्यास दुसरा इलाज नव्हता. सती जाणे जलसमाध घेणे, पेरें मारणें, प्रयागास करवत घेणें, जगन्नाथास रथ उरावर घेणें व हिमालयास स्वर्गास जाणे इत्यादी अघोरी आणि लज्जास्पद चालीमुळें ईश्वराचा क्षोभ अत्यत झाला तेव्हा दुष्ट लोकांस ताळ्यावर आणण्यास ईश्वरानें इग्रज सरकारची योजना केली.

( न. ५४ ) दुसऱ्या एका पत्रात या सहवासापासून होणाऱ्या फायद्याचें दिग्दर्शन केलें आहे, तें असे. आतां हिंदू लोकांनी उघड पहावे की, आम्ही श्रेष्ठ की दुसऱ्या देशाचे लोक श्रेष्ठ. ग्रथावरून

पहावे व लोकाचे तोंडून ऐकावे तेव्हां समक्ष भेट झाली तर चागले कीं नाही याचा विचार पहावा तेव्हा साक्षात् शहाणे लोकाची गाठ पडून हिंदू लोकाच्या वाईट चाली बहूत सुटल्या व आणखीही किती एक सुटतील आणि त्याची मने शुद्ध होउन त्यास राज्य-कारभार, व्यापारधदा कसा करावा हे ज्ञान येईल देशसुधारणा क्षणात होत नाही, तीस पुष्कळ विलब लागतो लहानमुलास शहाणे होण्यास दहावीस वर्षे लागतात, मग हा देश चांगला होण्यास दोनचारशे वर्षे लागतील तोपर्यंत या लोकास दुख आहे. परतु त्यास उपाय नाही. जशी शाळेमध्ये मुलानी शिक्षा घेतली पाहिजे तद्वत् हे आहे यापासून उत्तम फळ पुढे होईल या देशाचे लोकानी वर्णसकर होईल व धर्म बुडेल हें काही भय बाळगू नये. वर्णसकर होत नाहीं व धर्म बुडत नाही परतु मूर्खपणा मात्र बुडेल. धर्मामध्यें अधर्म भेसळ झाला आहे, त्यास लोक अधर्म म्हणतात. ते मात्र ज्ञानचक्षू आल्यावर जाईल वर्ण जे आहेत ते स्वाभावीक सृष्टीत आहेत म्हणजे कोणतेही देशात वर्ण नाहीत असे नाही वर्ण म्हणजे इतकेच की, चार प्रकारचे व्यापार ते सर्व देशात नेहमी असावयाचेच. मात्र हल्ली जो वर्णसकर आहे म्हणजे वास्त-वीक ब्राह्मण नसता ब्राह्मण म्हणवितात, शूद्रअसता ब्राह्मण म्हण-वितात व ब्राह्मण असता ब्राह्मण म्हणत नाहीत, हा वर्णसकर मात्र जाईल, आणि व्यवस्थीत होईल. लोक शहाणे झाले म्हणजे इग्रजास म्हणतील की, तुम्हासारखेच आम्ही शहाणे आहो, मग आम्हास अधिकार का नसावे ? मग हिंदू लोकाचें असे बहुमत पडलें म्हणजे सरकारास देणें अगत्य आहे. इकडील लोक राज्याचा कार-भार चागला करू लागले, लाच खावयाचें सोडून दिलें म्हणजे मोठाली कामें गव्हर्नराची सुद्धा त्याचे हाती येतील. आणि आपले

लोक पार्लमेंट व स्वराज्य भोगतील—वगैरे असे होईल यास संशय नाही, अशी मागील इतिहासावरून कल्पना होते आणि हें तथ्य आहे. अशी खातरजमा आहे."

शतपत्रात गोपाळरावानी जी निरनिराळी मते व्यक्त केली आहेत त्याचे येथपर्यंत दिग्दर्शक केले आहे या मताचा अनुवाद पुढे सर्व आयुष्यभर थोड्या फार फरकाने ते करीत होते. पेनशन घेऊन ते पुण्यास येऊन राहू लागले त्यावेळी त्यानी **स्वाध्याय** म्हणून जो ग्रंथ लिहिला आहे त्यात, व विशेषत: त्याच्या शेवटी जोडिलेल्या परिशिष्टात याच मताची पुनरावृत्ती झाली आहे. ग्रामण्ये, बहिष्कार इत्यादिकाचे कटु अनुभव गोपाळरावाना जसजसे स्वत च्या आयुष्यात आले, व बाहर प्रातात फिरून लोकाची मागासलेली स्थिती जेव्हा प्रत्यक्ष नजरेनें त्यानी पाहिली तेव्हा आपण म्हणतो ते बरोबर आहे असा विश्वास त्याना जास्त जास्त वाटू लागला व त्याची मते सुधारणेला जास्तच अनुकूल झाली. थोडासा फरक एवढाच झाला की, प्रार्थना-समाज, आर्यसमाज, थिऑसफी इत्यादी धर्माच्या पुनरुज्जीवनाकरिता चाललेल्या अनेक चळवळीचा व विशेषत. आर्यसमाजाच्या चळवळीचा त्याच्या मतावर अनुकूल परिणाम होऊन ( कदाचित् अहमदाबाद येथे दयानंदस्वामीचा निकट परिचय झाला त्याचे हे फळ असेल ) ते शेवटी शेवटी वैदीक धर्माचा पुरस्कार करीत असत. वेदात जे सागितलें आहे त्याचा पुन्हा उद्धार केला पाहिजे, व मधल्या काळात जे बरेंचसें स्मृती-शास्त्र-रूढी याच्यामुळे आमच्या रीतीरिवाजात घुसले आहे तें काढून धर्म शुद्ध केला पाहिजे, अशा मताकडे त्याचा कल (या) अखेरच्या दिवसात झुकत होता की काय, अशी शका **स्वाध्याय** हे पुस्तक वाचताना पुष्कळ वेळा मनात येते. दयानदाच्या शिकवणीचा एवढा बरेच परिणाम झालेला दिसतो की, जुन्याचा अभिमान

पूर्वीच्या लेखात जो अस्पष्ट, अस्फूट, अशा रीतीनें दिसत असे त्याल "**साध्यायां**"त व्यक्त स्वरूप आलेले आहे. गोपाळरावाच्या सामाजीक धार्मीक, राजकीय मताची परिणती या पुस्तकात झालेली आहे असे म्हणावयाला हरकत नाही. म्हणून थोडक्यात या मताचाआशय काय आहे ते सागतो.

"आर्य लोकाच्या शास्त्रात स्वाध्याय करावा असे लिहिले आहे व हे कर्म नित्य आहे म्हणजे प्रतिदिवशी केले पाहिजे वेदवेदागाचे दररोज सार्थ अध्ययन करणें याचे नाव स्वाध्याय. याला ब्रह्मकर्म असेही म्हणतात. ब्रह्मकर्मास ब्रह्मचर्य आवश्यक आहे परतु हल्लीच्या हिंदु समाजाने आचार सोडला, लोक स्वेच्छ व असन्मार्गी झाले, म्हणून प्रजा दुर्बल, क्षीण होऊ लागल्या देशात वाईट चालीरीतीचा बुजबुजाट झाल्यामुळे देशावर प्रीती करावी असेही कोणास वाटत नाही, व जोपर्यंत स्त्रियाची विटबना, जातीभेद असे प्रकार लोक चालू देतात तोपर्यंत देशावर प्रीती करा असे सागणेही निरर्थक आहे झाड मोठ्या जोमाने वाढून त्याचा चागला विस्तार व्हावा, त्याची छाया लाबवर जाऊन तिचा लोकास उपयोग व्हावा आणि त्यास चागली फळे येऊन त्याचा सर्वास उपभोग मिळावा अशी इच्छा करणाराने त्या वृक्षाचें बीजारोपण जर खडकावर केले तर त्याचे हेतू कितीसे सिद्ध होतील ' त्याचप्रमाणे लोकानी देशावर प्रीती करावी अशी इच्छा असल्यास प्रथमतः स्वदेशवृक्षाची चागली जोपासना करण्याकरितां त्याजमध्यें असणाऱ्या अविचारजन्य चालीरूढीरूप घातूक मुळ्या, सद्विचाररूपी कोयत्यानें समूळ खणून काढिल्या पाहिजेत, व त्यास सत्सगजीवनाने व सद्विद्याच्या खताने चागली पुष्टी दिली पाहिजे म्हणजे आपोआपच त्याच्या योग्य काळी त्यास देशप्रीतीरूपी फळाचा बहर येईल. साराश, प्रीती करण्याविषयी लोकाच्या सागण्याची आव-

श्यकताच नाही. प्रीतीजन्य पदार्थ असला म्हणजे तो आपणच सर्वांचें अंतःकरण आपणाकडे ओढून घेतो. तद्वत् देशामध्यें प्रीत्युत्पादक चालीरीति उत्पन्न झाल्या म्हणजे लोक सहज देशप्रीती व देशाभिमान बाळगतील. आमच्या देशातून स्वदेशप्रीतीचे व पूर्वजाच्या अभिमानाचे बीजच नाहीसे झाले आहे, यास वर लिहिल्यापैकीच काही तरी कारणें असावी ज्यानी सतीची चाल बंद केली, पुनर्विवाह सुरू केला, स्त्रीशिक्षण चालू केलें व अनेक विद्याशाळा स्थापिल्या त्यानी देशप्रीतीरूप वृक्षाचें बीज रुजत घातले असे म्हणावयास काही हरकत नाही"

अशा तऱ्हेची प्रस्तावना करून स्वाध्यायात ज्याचा अंतर्भाव होतो ती वेदवेदांगे, शास्त्रपुराणे, स्मृती, मंत्रतंत्राचे प्रकार वगैरे गोष्टीची माहिती ग्रंथाच्या आरंभी दिली आहे ही माहिती सांगून झाल्यावर एवढाच स्वाध्याय असेल तर हें ज्ञान आमच्या आजच्या गरजाना किती व कसकसें अपुरे आहे हे प्रत्येक ठिकाणी टीका करून दाखविले आहे शेवटी मूळ ग्रन्थाहूनही मोठी अशी परिशिष्टे जोडिली आहेत, त्यात पुराणाचा बाष्कळपणा, पुनर्विवाह, पतितपरावर्तन, भिक्षुकी वगैरे अनेक विषयावर मार्मीक पण प्रचलित लोकमताला अगदी विरुद्ध असे विचार कित्येक ठिकाणी सौम्य भाषेंत, बऱ्याच ठिकाणी वाचकाच्या व विशेषत. पुराणमताभिमानी वाचकाच्या मनाला झोंबेल अशा भाषेंत, पण सर्वत्र अत्यंत कळकळीने व स्पष्टपणानें आणि केवळ लोकाचे हीत व्हावे ही एकच भावना मनात धरून व्यक्त केलेले आहेत आणि शेवटी स्वाध्याय म्हणजे आज उपयोगी पडणाऱ्या सर्व विद्यांचें अध्ययन अशी व्यापक व्याख्या करून इतिहास, राज्यकारभार, कायदेकानू, राजनीती, उद्योगधंदे, शिक्षण वगैरे अनेक विषयावरील माहिती व त्यासंबंधानें आपले विचार लोकहितवादी यानी व्यक्त केले आहेत. या परिशिष्टातून

व्यक्त केलेली मतें शतपत्रातील मतांहून निराळी नाहीत. म्हणून त्याची पुनरावृत्ती येथें करीत नाही. लोकहितवादींनी आमच्या जुन्या विद्याची मनसोक्त निंदा केली असा त्याच्यावर आरोप अनेक टीकाकारांनी केला आहे व विशेषतः पुराणास शिमग्याची उपमा दिल्याबद्दल तर सर्वजणाचाच त्याच्यावर घुस्सा झालेला दिसतो. तेवढ्या विषयापुरते पुराणाविषयीं त्याचें मत काय होते तें कळावे म्हणून जरूरीपुरते एकदोन उतारे त्या परिशिष्टातून वगैरे येथे घेतों.

"पुराणें एकदर अठरा असून, त्यात प्रत्येक पुराणात एक देव मुख्य कल्पून त्याची स्तुती व थोडीशी भरीला इतर देवाची निंदा असा प्रकार केला आहे. निंदेवाचून म्हणून कोणताही देव या रीतीने शिल्लक राहिला नसून स्तुतीची तर सर्वच ठिकाणी अतिशयोक्ती झाली आहे पुष्कळ ठिकाणी पुराणाचे लेखक कवित्वात घसरले. त्यानी गौरवार्थ म्हणून जी निंदा स्तुती केली ती आज आपण शब्दश. खरी खोटी मानितो. यामुळे एकदरीत परिणाम पुराणानी धर्मात फार घोटाळा केला एवढाच शिल्लक राहतो. जुनी अठरा पुराणे सोडून दिली तर अर्वाचीन काळी त्यात घुसडून दिलेली किंवा स्वतत्र रीतीनें लिहिलेली नद्या, क्षेत्रे इत्यादिकाची महात्मे, स्तोत्रे वगैरेंनी तर हा घोंटाळा ज्यास्तच केला. अर्वाचीन साधुसतानी मात्र पुराणाची खरी योग्यता ओळखिली होती असे दिसते. पुराणाच्या एकदर काळाला हिंदुस्थानच्या इतिहासातला पडता काळ असें म्हणता येईल. त्यांच्यामुळे जातीजातींतील कलह माजले, एका जातीचें फाजील स्तोम माजलें व इतर जातीच्या मनात आपल्या हीनत्वाची खोटीच कल्पना दृढमूल झाली. कदाचित् या प्रकारचीं बरीचशी वर्णनें कोणी तरी मागाहून मूळ पुराणात घुसडून दिलेलीही असतील. तथापी एकदरीत पुराणांचा परिणाम अनिष्ट झाला.

"येथपर्यंत पुराणांपासून या देशावर आलेल्या अनर्थांचें—अज्ञान-प्रसारांचे—वर्णन यथार्थत्वेंकरून केलें. तरी त्यातील गुणांविषयी स्तब्ध राहणें हें अधमपणाचे होईल असे आमचें मत आहे. पुराणातील पुष्कळशी वर्णनें म्हणजे कवींची लापिका किंवा रसभरीत काव्य एवढी खूणगांठ मनाशी बांधिली म्हणजे पुराणाचा उद्देश ईश्वराचे ठिकाणी मनुष्याची भक्ती वाढवावी असाच होता असें म्हणणे भाग आहे. वाद एवढाच की, मुख्य गोष्टी कोणत्या व अलंकारभूत कोणत्या याचे भान कवींना व वाचकांना दोघानाही न राहिल्यामुळे खऱ्याचें खोटें होऊन घोटाळा झाला आहे. तरी देखील अज्ञानी लोक, स्त्रिया, मुलें वगैरे यांच्या समोर पुराणांनी स्त्रीपुरुषांच्या चारित्र्याचे चांगले आदर्श पुष्कळच ठेविले व त्यामुळे हिंदुस्थानातल्या स्त्रियाइतक्या सदाचरणी, धार्मिक, विनम्र, पापभीरू, सुशील अशा स्त्रिया इतर देशात सापडणार नाहीत.

" सर्वांनी विचारपूर्वक पुराणातील तत्त्वार्थाचे ग्रहण केल्यास पुराणांनी एकदरीत लोकांवर उपकारच केले आहेत असे म्हणावे लागेल. धर्माचें सौलभ्य पुराणांनी करून दिले. तोच क्रम त्यातील रहस्य ओळखून प्राकृत साधुसंतांनीही चालू ठेविला. पण हें सर्व आज लोपलेले आहे. पुराणाचें खरें तत्त्व व त्याचा खरा उपयोग जेव्हां लोक समजू लागतील तेव्हाच ते व त्यांचा देश उर्जितावस्थेस येईल व कल्पित कलिपाशांतूनही ते मुक्त होऊन ऐश्वर्याप्रत पावतील."

खास लोकहितवादींची मतें ज्यात स्पष्टपणे प्रतिपादन केलेली आहेत असे 'शतपत्रे' व 'स्वाध्याय' हे ग्रंथ—एक अगदी पूर्व वयातील, पहिलाच—व दुसरा जवळ जवळ अखेरीच्यापैकी एक—घेऊन त्यांतील मुख्य मुख्य भागांचा खुलासा येथपर्यंत केला आहे. हे दोन्ही ग्रंथ जोडीनेंच वाचिले पाहिजेत. म्हणजे जुन्याचे खंडन व

नव्याचे मंडन लोकहितवादींनी कोणत्या प्रकारानें केले आहे तें समजते. त्याचप्रमाणे दोहींची तुलना करू लागले म्हणजे पहिल्यात—शतपत्रात—अर्थात्‌च ती मूळची पत्रे आहेत व त्याचा लेखनकाल १८५० च्या सुमाराचा आहे ही गोष्ट लक्ष्यात ठेविली पाहिजे—एक प्रकारचा सरळपणा, मनाला येईल ते भीडभीड न धरता सांगण्याची प्रवृत्ती व लोकहिताविषयी कळकळ हे गुण पूर्णपणें प्रत्येक ओळीत भरले आहेत असे वाटते. दुसऱ्यांत—हा ग्रन्थ उत्तर वयात, शांतपणी, आणि ग्रंथ म्हणून लिहिला ही गोष्ट लक्षात घेतली तर—सरळपणा व कळकळ या गोष्टी आहेतच, पण त्याचेबरोबर अनेक प्रकारच्या माहितीची जोडही झालेली दिसते व एवढ्या लहानशा पुस्तकात इतके भांडार साठविले आहे व तेही अगदी सहजासहजी लीलेने, याचे मोठे कौतुक वाटतें "स्वाध्याय" म्हणजे जुन्या कल्पनेप्रमाणे ब्राह्मणाला अवश्य असणारे सर्व ज्ञान या पुस्तकात थोडक्यात आले आहे. इतकेच नव्हे, तर त्याच्यावरील टीका व त्याच्या जोडीला नवीन ज्ञान कोणते पाहिजे तेही परिशिष्टातून दिले आहे पण या कौतुकाच्या बरोबर दुसरा एक विचार मनात येतो तो असा की, थोडीशी कुशलतेची व विनोदीपणाची जोड मिळाली असती तर बरेच ठिकाणी पुनरावृत्ती वाटते ती टळून व सरळपणाचें पर्यवसान हेकेखोरपणात होतें आहे की काय, अशी जी शंका मधून मधून वाचकाच्या मनात चमकते ती न चमकता, पुस्तकाच्या विचारसरणीत थोडासा जास्त गोडपणा, थोडेसें जास्त माधुर्य आले असते स्वाध्याय हे पुस्तक फार मागें पडले आहे तें का? पुस्तक टाकाऊ आहे म्हणून, का निबंधमालाकारानी आपली कुऱ्हाड पोरपणाने—याला दुसरे नाव मला तरी सुचत नाही—पांढरे केस झालेल्या लोकहितवादीच्या डोक्यात घातली म्हणून? ही दोन्ही कारणे खरी नाहीत—निदान मला तरी ती पुरेशी वाटत नाहीत—एकाच नजरेनें

एकदोन पिढ्या गोष्टी पाहण्याची सवय झाल्यामुळे नजरेला वळण तेंच लागले, डोळे तिकडेच कलले, व त्याना एकप्रकारचा हेकटपणा आला, असा जो पुस्तक वाचताना वाचकाचा ग्रह होतो तेही एक कारण—अनेकांपैकी एक असेल—पण बरेच बलवत्तर असे कारण हें पुस्तक मागे पडण्याला झाले, असे वाटतें.

"लोकहितवादी" याची खास मते या वरील लेखसंग्रहातून ग्रथित झालेली आहेत. याशिवाय नोकरीत असताना ज्या ज्या ठिकाणी राहण्याचा त्याना प्रसंग आला त्या त्या ठिकाणी व्याख्याने, निबंध, चर्चा अशा अनेक रूपांनी ते आपल्या मताचे प्रतिपादन करीत. त्यामुळे त्याची मते कोणती, याची शंका कोणाला कधी आलीच नाही. इतकेच नव्हे, तर अमूक अमूक प्रकारची मते म्हणजे लोकहितवादीच्या सारखी मते असे वर्णन केलें तर ते पुरेसे व्हावें इतकी प्रसिद्धी त्या मताना, त्या विचारसरणीला मिळालेली होती. यामुळे कदाचित् असेल, पण विष्णुशास्त्री चिपळुणकरानी आपल्या नवीन विचाराचा पुरस्कार करण्याकरिता जेव्हा निबंधमाला काढिली, त्यावेळी मागील्या पिढीचे निदर्शक म्हणून त्याना निवडून त्याच्यावर टीकेची झोड उठविली असावी असे वाटते शास्त्रीबुवाचे लोकहितवादीवर मुख्य आक्षेप असे आहेत की, याना आपल्या संस्कृतीचें पुरेसें ज्ञान व तिचा पुरासा अभिमान नाही. आपल्या लोकाची राज्यें गेली याची इतर कारणें काही आहेत की नाहीत याचा विचार न करिता, आपले आचारविचारच चुकीचे, समाजात शिस्त नाही, अशा तऱ्हेनें सर्व दोष आपल्याच अंगावर ओढून घेऊन हे स्वजनाची निंदा करितात, इंग्रजाच्या राजकीय सामर्थ्यामुळे यांचे डोळे दिपले आहेत, व इंग्रजी राज्य, इंग्रजी संस्कृती याकडे याचा फाजील ओढा अशा प्रकारानें हे—व या पिढीतील इतर लोक—

आत्मनिंदेने तरुण पिढीचा किंबहुना सर्व राष्ट्राचा तेजोभंग करि-तात, त्याच्या या बड्या अपराधाबद्दल निबंधमालेचे कित्येक अंक खर्ची घालून शास्त्रीबोवानी "लोकहितवादी"ना आपल्याकडून अगदी चीत केले आहे. "लोकहितवादी"च्या मनात व आचारात थोडीशी जुन्याची झाक असून प्रार्थना–समाज, थिऑसफी, दयानंदाचा आर्य-समाज इत्यादी नवीन मताची थोडीथोडी झाकही त्यात चमके, व मनात आलेले विचार व्यक्त करण्याची त्याची पद्धत थोडीशी सडेतोडपणाची व लहरीची असल्यामुळे त्याच्या मताच्या विविधपणाला थोडेसे विचित्रपणाचेही स्वरूप येत असे. या कारणाने त्या वेळीही ती मते लोकाना आवडेनाशी होत होती त्यातच मालाकाराच्या जोरदार टीकेची भर पडल्यामुळे ती मते खरोखरच चीत झाली असे त्या पिढीला वाटले. व ही स्थिती आज जवळ जवळ एक पिढीपर्यंत टिकली. गेल्या दहापाच वर्षात तिच्यात थोडासा फरक पडलेला आहे. लोकहितवादीच्या विचार-सरणीत घेण्यासारखे पुष्कळ आहे, त्याची तत्कालीन लोकस्थितीची मीमांसा फारशी चुकलेली नव्हती, त्याचे बोलणे अप्रीय असले तरी खरेपणाचे व मनापासूनचे होते असे नवीन पिढीतील पुष्कळ विचारवान् आणि निःपक्षपातीपणाने विचार करणाऱ्या माणसाना वाटते. उलटपक्षी मालाकाराची टीका चुरचुरीत, खमंग व चवदार असल्यामुळे तिचें सेवन त्या पिढीने उत्कंठेनें केले. आजही केवळ भाषेच्या दृष्टीनें पाहिले तर ते लेख वाचनीयच आहेत. पण विचारापेक्षा विकाराचीच छाप त्यात जास्त दिसते असे वाटावयाला लागल्यामुळें नुसत्या चवदार भाषेची किंमत तितकी वाटत नाही मात्र तशा प्रकारच्या भाषेमुळें त्या विचारांचें वळण तरुण पिढीला लवकर लागलें व त्याचा अतिरेक पुढील पिढीत बदललेल्या राजकीय परिस्थितीमुळें झाला.

खुद शास्त्रीबुवा व लोकहितवादी यांचा विचारसरणीत फारसा फरक नाही शास्त्रीबुवाना तरी भटाभिक्षुकांचा, किंवा त्यांच्या कर्मठपणाचा अभिमान मनापासून कोठे वाटत होता ? त्याची इंग्रजी संस्कृतीवरील श्रद्धा पाहिली, व त्या श्रद्धेला कृतीचे स्वरूप देण्याकरिता त्यानी किती आणि कसे प्रयत्न केले—निबंधमाला हा देखील त्यातीलच एक प्रयत्न म्हटला पाहिजे—हे लक्षात घेतले म्हणजे लोकहितवादींवर त्यानी तुटून पडावें, व त्या तुटून पडण्यात त्याना इतके अवसान यावे याची मोठी मौज वाटते पण त्याचा स्वभाव, त्याची परिस्थिती या गोष्टीतच या सगळ्या प्रकाराचे रहस्यही सापडण्यासारखें आहे वडील, थोरले शास्त्रीबुवा, याची बुद्धी बृहस्पतीसारखी सर्व विषयात अकुंठीत चालणारी होती तशीच धाकट्याचीही, कदाचित् काकणभर जास्त, पण कमी नव्हे त्यातून दांडग्या विद्याव्यासंगाने त्यानी कमाविलेलें ज्ञानभांडार त्या वेळच्या मानाने फार मोठे होते त्याच्या तोडीचा विद्याव्यासंग कुंटे, जिनसीवाले याच्यासारख्या थोड्याच पुरुषात त्यावेळी होता. या गुणाचा उपयोग योग्य अभिमानपूर्वक जुन्या संस्कृतीचा उद्धार करण्याकडे, व राष्ट्राचा आत्मविश्वास वाढविण्याकडे करावयाचा, असा श्लाघ्य संकल्पही त्यानी केलेला होता पण थोर कुळात जन्म, चांगली बुद्धिमत्ता, विद्याव्यासंगाची हौस, आणि उत्कट देशाभिमान या गुणांच्या जोडीला चांगल्या विद्येबरोबरच येणारा विनीतपणा असता तर बहार झाली असती पण दुर्दैवाने तसे झाले नाही. याचा अर्थ त्याच्या अंगी हा गुण कधी आलाच नसता असा मात्र अर्थ नव्हे. ते काही दिवस जास्त जगले असते तर जगाच्या वाढत्या अनुभवाबरोबर त्याच्या स्वभावांत व उक्तीत मऊपणा आला असता असेंच मत, अशीच आशा खुद्द “ लोकहितवादी ” यानी देखील एका प्रसंगाने व्यक्त केली आहे. परंतु ज्या परिस्थितीत ते वाढले

त्या परिस्थितीत आपल्या मतें स्पष्टपणानें—पण वास्तवीक कठोरपणाने व उच्छृखलपणानें—"लोकहितवादी"साख्याच्यावर टीका करण्यातच आपण देशकार्य करीत आहोत अशी भावना त्याच्या मनात उत्पन्न झाली. व टीकाविषयक निबध हें त्या भावनेचेंच दृश्यफल होय अशी त्याची उपपत्ती लावता येते. शास्त्रीबुवाचा भावनाप्रधान स्वभाव व तात्कालीन परिस्थिती या गोष्टी लक्षात घेतल्या असताना लोकहितवादी, मिशनरी, जोतीबा फुले, दयानद, या निरनिराळ्या व्यक्तीवर किंवा सस्थावर त्यानी जी टीका केली आहे तिची उपपत्ती थोड्याशा निराळ्या दृष्टीनें अशीही करता येईल. सन १८५८ सालच्या जाहिरनाम्याप्रमाणे लोकाच्या धर्मसमजुतीत आपण हात घालणार नाही असे वचन इग्रज सरकारनें दिले. याचा एक परिणाम असा झाला की, जुन्या धर्मसमजुतीत ज्याना तथ्य वाटत नव्हते अशा मडळींना आपल्या धार्मिक आकाक्षाना मूर्तस्वरूप देण्याची सधी मिळाली. व ब्रह्मसमाज, आर्यसमाज, प्रार्थनासमाज, अशा प्रकारच्या धार्मिक चळवळी उदयाला आल्या. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा परकीय धर्मप्रसारकानीही त्याचा फायदा घेतलाच. अशत: राजाश्रयाच्या जोरावर, आपली सस्कृती हिंदू सस्कृतीपेक्षा उच्च आहे या भावनेने, व अशत· पाश्चात्य शिक्षण देण्याकरिता म्हणून या देशात मिशनरी शिरले. व मोठमोठ्या शहरी शाळा, व्याख्याने, अशा अनेक रूपानी त्याच्या चळवळीला सुरवात झाली. हिंदू लोक धर्माच्या बाबतीत कडव नाहीत. त्याची धर्मश्रद्धा कर्मठपणामुळे मलीन झालेली असली तरी ती खोल आहे. यामुळे आपल्यातील शिकलेली मडळी धर्मसुधारणेच्या, जुने बुडविण्याच्या, मार्गाला लागल्याबरोबर प्रतिक्रिया आपोआपच सुरू झाली व विष्णुबुवा ब्रह्मचारी याच्यासारखे जुन्याचे कट्टे कैवारी

उभे राहिले. भोंवती चाललेल्या या धार्मीक खळबळीचा परिणाम शास्त्रीबुवावर झाला व विशेषतः नवीन धार्मीक मतप्रचारकाच्या कित्येक विचारात व आचारात आत्यंतिकपणाची, दुसऱ्या टोंकाला जाण्याची जी प्रवृत्ती दिसून येत असे त्यामुळे या सुधारणात काही अर्थ नाही, त्या हाणून पाडल्याच पाहिजेत असे त्याच्या मनानें घेतलें. त्याच्या मनोभावनेची ही चिकित्सा खरी असेल तर मग मात्र निबधमालेत मिशनऱ्याची वगैरे टर करण्याची जी प्रवृत्ती दिसते तिची उपपत्ती लागते. दयानदाची ताबडी टोपी किंवा जोतीबाचे तावडे पागोटे हे पाहिले म्हणजे शास्त्रीबुवा बुजत ते स्वत भटाभिक्षुकावर टीका करीतच, पण लोकहितवादींनी केली म्हणजे त्याच्यामागे दयानद, जोतोबा, मिशनरी लपले आहेत की काय, या भीतीने गागरून हातात जे सापडले त्या हत्याराने—नव्हे, लेखणीने—त्यानी रावबहादुरावर प्रहाराचा वर्षाव केला धर्माचे कसे होणार या भीतीनें गागरून गेलेल्या मनाचे प्रतिबिब निबधमालेच्या रावबदुरावरील टीकेंत किंबहुना सर्वच लेखात स्पष्ट दिसते.

**शतपत्रें व स्वाध्याय** हे ग्रथ वाचीत असता दुसरा एक विचार मनात उभा राहतो तो असा की, अशा प्रकारचे लेख लिहावयास लागणारी विपुल माहिती व खोल विचार करण्याची सवय या गोष्टी गोपाळरावाना कशा प्राप्त झाल्या ? त्याचे इतर लेख म्हणजे इदुप्रकाश, वृत्तवैभव वगैरे पत्रातून १८६३-६४च्या सुमारास प्रसिद्ध झालेले, त्याचप्रमाणें **ऐतिहासीक गोष्टी व टिपणें, सुभाषितें** व निरनिराळ्या विषयावर लिहिलेले उत्तर वयातील लेख व निरनिराळ्या ठिकाणी दिलेली व्याख्यानें, ही लक्षात घेतलीं म्हणजे त्याच्या माहितीच्या विपुलतेबद्दल व आणि विविधपणाबद्दल, त्याचप्रमाणें विचाराच्या मार्मीकतेबद्दल वाटणारें कौतुक खरोखरीच किती तरी जास्त वाटावयाला लागतें. त्या

काळच्या पिढीत गोपाळराव म्हणजे एक चालता बोलता विश्वकोशच होते असे म्हटलें तरी चालेल. ही माहिती त्यानी मिळविली कशी व केव्हा हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. त्याच शाळेतील शिक्षण विविध प्रकारचे झालें होते, किंवा लहानपणी निर्वेध अध्ययन करण्याला त्याना फारशी फुरसत मिळाली होती अशातला प्रकार नाही. त्याचे वडील हरोपत १८३५ साली वारले व त्या बाल-वयापासूनच ससाराची कमीजास्ती काळजी त्याच्यामागे लागली, या गोष्टी मागें सागितल्याच आहेत. ही विवचना मागें असताच त्यानी तीन वर्षे पुण्याच्या इग्रजी शाळेत घालविली. हे एवढेच त्याचे शिक्षण व्यवस्थितपणे झाले. पुढल्या ३।४ वर्षात नोकरी सभाळून मुनसफीचा अभ्यास त्यानी केला. बरे, त्यावेळी पुण्याला विद्वान् मडळी पुष्कळ होती व त्याचा सहवास गोपाळरावाच्या सारख्या तरुण माणसाला सहज घडण्यासारखा होता असेही वाटत नाही. इग्रजी शाळेच्या थोड्याफार मास्तराशिवाय इतर इग्रजी शिकलेले लोक पुण्यात त्या काळी फार नव्हते, सरकारी नोकरीत एखादा असला तर आपण आता शतकृत्य झालो असें समजून त्याचे वाचन बद झालेले असावयाचे. पुण्याची लायब्ररी सन १८४८ त स्थापन झाली व त्यावर्षी तेथे ३०० च्या वर ग्रथ नव्हते. इतक्या सर्व गोष्टी प्रतिकूल असल्या तरी एकदोन गोष्टीची गोपाळरावाना अनुकूलता होती. त्या अशा:—त्याची उद्योग करण्याची हौस फार जबर असे. सापडला क्षण फुकट घालवावयाचा नाही, कानडोळे उघडे ठेवून चालावयाचे, पुस्तकातून तर खरेंच, पण त्याहीपेक्षा जग हें जें सर्वात मोठें व सर्वात विविध असें पुस्तक परमेश्वरानें निर्माण केलें आहे, त्यातून मार्मीक बुद्धीनें जो जो माहितीचा, ज्ञानाचा कण काही मिळेल त्याचा नम्रपणानें शिष्यभावानें सग्रह करावयाचा, व तो

स्मरणातून जाऊ द्यावयाचा नाही हा त्याचा जन्मस्वभावच होता असें म्हटले तरी चालेल. दाडगी स्मरणशक्ती, चौकसपणा, मार्मीक अवलोकन शक्ती, सारासार विचार हे सर्व ज्ञानार्जनाला अनुकूल असणारे गूण परमेश्वराने त्यांना हवे तेवढे दिले होते, व त्याज-बरोबर उत्तम शरीरप्रकृती व निरलसपणा यांची जोड घालून दिली होती. त्याच्या सभोवतालच्या जगात होणाऱ्या घडामोडी इतक्या विलक्षण होत्या की, आधळ्याला देखील त्याजकडे न पाहणें अशक्य होते आज पेशवाई गेली, उद्या ठगी गेली, परवा सती गेली, शीख अफगाण बुडाले. देखता देखता कोणाला पोर नाही म्हणून, कोणी मूर्ख म्हणून, तर कोणी दुर्बळ म्हणून, एका मागून एक सस्थानीक बुडून जिकडे तिकडे तांबडा रग चढला, नावाची कां असेना, पण आजपर्यंत जीव धरून असलेली, दिल्लीची बादशायत एका क्षणात बुडाली, इतकेच नव्हे, तर ज्या कपनी सरकारच्या सलामतीमुळे हे सर्व मन्वतर घडून आले ते कपनी सरकार देखील एका कागदाच्या चिठोऱ्याबरोबर आणि लेखणीच्या फटकाऱ्यानें नाहीसे झाले हा केवढा चमत्कार ! या गोष्टीच अशा होत्या की, त्यानी मुक्याना वाचा फोडली असती व पागळ्याना पर्वताचे उलघन करावयाला लाविले असते. मग गोपाळरावासारख्या हव्यासी व चौकस माणसाला त्यानी वेध लाविला हे आश्चर्य नव्हे त्यांतूनही आप-ल्या सरकारी नोकरीच्या प्रसगाने अनेक तऱ्हेची माहिती मिळविण्याचे प्रसग गोपाळरावाना अनेक रीतींनी आले हीही एक अनुकूल गोष्ट म्हणून लक्षात ठेवावयाला हरकत नाही. मुनसफ झाल्यापासून थोडीफार फुरसद त्यांना मिळू लागली, व त्याहीपेक्षा विशेष गोष्ट म्हणजे विवीध प्रकारची माहिती मिळविण्याचे प्रसगही अनेक येऊ लागले. वकील, न्यायाधीश याचा पेशा अशा दृष्टीनें इतर

धंद्यापेक्षां थोडासा जास्त सोयीचा असतो. कोर्टात निरनिराळ्या प्रकारचे खटले, त्यातले साक्षीदार व साक्षीपुरावे, फिर्यादी आरोपी, खरेखोटे, गरीब श्रीमत वगैरे सर्व प्रकारचे लोक येतात. वकीलापेक्षा त्यातल्यात्यात न्यायाधीशाला या सर्वांचे निर्विकार मनानें व त्रयस्थाच्या नात्याने निरीक्षण करण्याची सधी फार मिळते. गोपाळराव अशा प्रसगाचा होईल तितका फायदा घेत असत. कोर्टात आपल्यापुढे आलेल्या एखाद्या माणसाकडून किंवा कागदपत्रावरून काही चमत्कारीक, मनोरजक व ऐतिहासीक माहिती मिळण्यासारखी दिसली तर तितक्यापुरते कोर्टाचे काम जरूर तर बाजूला ठेऊनही तेवढ्या माहितीचें लहानसे टिपण करून ते घेत असत. त्याचप्रमाणे, सभाषणात एकादी नवीन गोष्ट कळली तर तेवढी लक्षात ठेवून घरी गेल्यावर तिचे टिपण करीत. इनाम कमिशनच्या कचेरीत त्याची नेमणूक झाल्यापासून हे प्रसग त्याना नित्याचेच झाले होते. निरनिराळ्या जिल्ह्यात फिरावे, इनामाची चौकशी करावी व ती करिताना त्या त्या इनामाची पूर्वीची माहिती, त्या त्या ठिकाणचे विशिष्ट रीतीरिवाज, इनामाच्या सनदाची चौकशी व त्याच्या खरेखोटेपणाबद्दल, वहिवाटीबद्दल अनेक प्रकारचा पुरावा वगैरे तऱ्हेची माहिती त्याच्यापुढे साहजीकच येत असे. त्याचप्रमाणे काही दिवस हायकोर्टात हिंदू कायदेकानूचे Digest तयार करण्याच्या कामाकडे त्याची नेमणूक झाली होती. त्यावेळी हिंदूचे निरनिराळे रीतीरिवाज, त्याच्या दानपद्धती किंवा वारसापद्धती वगैरे गोष्टीविषयी ऐकीव व धर्मग्रथांतून माहितो त्याना मिळाली असलीच पाहिजे, वृत्तवैभव व इदुप्रकाश या पत्रातून १८६३ च्या सुमारास प्रसिद्ध झालेले लेख व ऐतिहासीक गोष्टीचे दोन भाग या ठिकाणी या माहितीचा उपयोग केलेला आहे. **ऐतिहासीक गोष्टी** ( भाग

१।२ ) ही पुस्तकें त्यांतल्यात्यांत विशेष वाचनीय आहेत. भाषेच्या व गोष्टी सागण्याच्या शैलीच्या दृष्टीने पाहिले तरीही ही पुस्तकें फारच सरस ठरतील. पहिल्या भागातील गोष्टी विशेषत ऐतिहासीक आहेत व त्याचे 'मराठेशाहीतील गोष्टी', 'पेशवाईतील गोष्टी' व 'होळकरशाहीतील गोष्टी' असे निरनिराळे भाग केलेले असल्यामुळे कोणतीही गोष्ट लवकर सापडणे सोपें झाले आहे. स्थळवर्णनें, लोकवर्णनें ग्रथ व ग्रथकार, धर्मविषयक चालीरीती, उपयुक्त टिपणे, उपदेशपर टिपणे वगैरे प्रकरणे दुसऱ्या भागात येतात

गोपाळरावाची गोष्ट सागण्याची हातोटी वाखाणण्यासारखी आहे. त्याच्या गोष्टींत पाल्हाळ नाही. जे सागावयाचे असेल तें मुद्देशीरपणानें, थोडक्यात व सरळपणाने, फाटे न फोडता सागावयाचे; भाषा अगदी साधी असावयाची, वाचाणाराला असे वाटले पाहिजे की, आपण गोष्ट प्रत्यक्ष त्याच्या तोंडून ऐकत आहोत. घटकाभर रिकामा वेळ असला, पाच मिनिटे फुरसत सापडली, तरी कोणतीही एकदोन पाने काढून वाचावी, काही तरी नवीन माहिती मिळते, थोडीशी करमणूक होते अशा प्रकारची ही पुस्तके आहेत. एकदम आरंभापासून अखेरपर्यंत वाचीन म्हणून फायदा नाही. थोडे थोडें वाचून गोष्टी मनात मुरू दिल्या पाहिजेत. '**क्षणे क्षणे यन्नवतामुपैति। तदेव रूपं रमणीयतायाः।**' हे वर्णन त्याना चागले लागू पडेल. या पुस्तकातील एकदोन गोष्टी येथे देतो.

## १ दिवाणी अदालतीचा देखावा.

पुण्यात कॅ० रॉबर्टसन साहेब बहादूर हे १८१७ पासून १८२७ पर्यंत कमिशनरीचे कारकीर्दींत कलेक्टर होते. परतु त्यांजकडे सर्व कामें असत व त्यांतच दिवाणीही असे. कोडते वगैरे ही कायदे प्रसिद्ध होऊन पुढे बसली. तेव्हा त्यानी दोन चित्रें करून दर-

वाज्यावर मांडिली होती. एक वादी व एक प्रतिवादी. दोघेही उघडे बोडके ! वस्त्रपात्र जाऊन भिकारी झालेले ! त्याचे शेजारी वकील खोबरें खात उभे आहेत आणि वादी प्रतिवादी यांचे हातांत करवंट्या असून ते कपाळ फोडीत आहेत असे दाखविले होते ! जे कोणी तंटे तोडण्यास साहेबाकडे येत त्यास प्रथम 'ती चित्रे पहा' म्हणून साहेब सांगत, व 'तुम्ही आपसांत समजा, नाहीं तर या तसबिरीप्रमाणे वकील लोक दुर्दशा करतील, याउपर तुमची खुषी असेल तर तुम्ही लढा !' या उपदेशाचा अनुभव लक्षावधी लोकांस आलाच आहे. आतां त्याची फारशी व्याख्या करावयास नको !!

## २ अहमदाबादचे काजीसाहेब.

सन १७७९ सालीं राघोबाचे तर्फेनें इंग्रजाची फौज खंबायतास उतरली तिनें अहमदाबादेवर येऊन अहमदाबाद शहर घेतलें व तेथें पंधरा दिवसपर्यंत इंग्रजी अमल होता पुढें आठास व ढभईं येथें लढाया होऊन हरीपंत फडके यांनीं इंग्रजाचा मोड करून सर्व मुलूख लागलाच परत घेतला. या पंधरा दिवसांत पांच सहा दिवस जनरल गॉडर्ड याचा मुक्काम जमालपूर दरवाज्याबाहेर होता व पेशव्याचे सर्व अमलदार पळून गेले होते मग तिसरे दिवशीं गांवचे लोकांनीं विचार केला कीं, 'आपण सर्वजण मिळून साहेबास भेटावयास जाऊं.' मग काजीसाहेबास पुढें करून ते भेटावयास गेले. साहेबापुढें गेले तो प्रथम साहेबानीं विचारिलें कीं, 'आम्ही येथें तीन दिवस आहों तर तुम्ही हा दिरंग कशाकरितां केला ?' तेव्हां काजी यानें जें समयोचीत उत्तर दिलें तें ऐकून साहेब फार खूष झाले. तें उत्तर असें होतें —

काजीसाहेब म्हणाले कीं, 'आम्ही आजपर्यंत पेशव्याची रयत होतों. पहिलेच दिवशीं आपणाकडे आलों असतों तर आपणच आम्हाला

निमकहराम म्हटले असते. पेशव्याचे अमलदार गेले न गेले तोच गावचे लोक आम्हाकडे येऊन हजर झाले! याजकरिता आम्ही तीन दिवस वाट पाहिली, व आता गावात पेशव्याचे कोणी नाही तेव्हा रक्षण कोण करील? असे समजून धन्याने आम्हास टाकिले असा निश्चय झाला, पूर्वीचे अमलातील सर्व लोक पळून गेले, आम्हास आता कोणी त्राता राहिला नाही, अशी खात्री झाल्यावर आम्ही आपणास भेटावयास आलो हे ऐकून साहेब खूष झाले.

ऐतिहासीक गोष्टी या पुस्तकात कथानकाचा भागच पुष्कळ आहे. लोकहितवादीच्या मताची छाया कचित् ठिकाणी गोष्टीत पडलेली दिसली तरी मुख्य हेतू जो गोष्ट चागल्या तऱ्हेने सागणे, तो बाजूला सारून मताना फाजील महत्त्व कोठेही दिलेले नाही अशाच प्रकारचे निबध आणखी एक दोन आहेत, त्याचा जाता जाता थोडा परामर्ष घेऊ. **'ग्रामरचना'** (१८८३), **'स्थानीक स्वराज्य'** व 'दयानद स्वामी'वर एक चरित्रात्मक लेख ही 'लोकहितवादी' मासीक पुस्तकातून प्रसिद्ध झालेली प्रकरणे, त्याचप्रमाणे 'इदुप्रकाश', 'वृत्त-वैभव' वगैरे पत्रातून निरनिराळ्या धर्माची माहिती देणारे लेख ही अशा प्रकारच्या निबधाची उदाहरणे होत नमुन्याकरिता **'ग्राम-रचना'** हा त्यातल्या त्यात सरस असा निबध विवेचनाकरिता येथे घेतो

**सारांश**—"अतिप्राचीन काळी हिदुस्थानात मोठमोठी अरण्ये होती व त्यात मनुष्यानी परिश्रमाने वसाहती स्थापन केल्या त्यास क्षेत्रे म्हणत. येथून हिदुस्थानातील ग्रामरचनेला सुरवात झाली व अन्न, वस्त्र, पाणी व छाया या मनुष्याच्या सुखाला अवश्य असणाऱ्या गोष्टी जेथे जेथे विपुलतेनें मिळाल्या त्या त्या अनुरोधाने गाव वसले व कुलकर्णी-पाटील ही बलुती अस्तित्वात येऊन ग्रामसस्था जन्मास आल्या. त्या १९ व्या शतकाच्या आरभापर्यंत जीवत होत्या. मध्ये कित्येक राज्य-

झाल्या झाल्या तरी या ग्रामसंस्थाना काहीही धक्का लागला नाही. इंग्रजी अमलाच्या आरंभी मात्र सरकारने मुलुखाची नवीन व्यवस्था लाविली, त्यावेळी सरसहा नवीन व एकसूत्री पद्धती सुरू करण्याकरिता ग्रामसंस्थांचे अधिकार कमी केले तेव्हापासून ग्रामसंस्थांचा व व त्याबरोबरच लोकांचा एकसारखा ऱ्हास होत आहे. याच सुमारास यंत्रकला व तज्जन्य औद्योगीकक्रांती यांच्या युगाला युरोपात सुरवात झाली व तिकडील वाढत्या उद्योगधंद्याचा परिणाम आमच्या उद्योगधंद्यावर विपरीत होऊन त्यामुळे आमच्या शेतकऱ्यांची स्थिती अधिकच खालावली आजकाल रयतेची स्थिती सुधारत आहे का बिघडत आहे, याविषयी अतिशय परस्परविरोधी अशी मते ऐकू येतात. जुन्या दृष्टीने पाहणाऱ्याला आगगाड्या झाल्या, नवीन नवीन जिन्नस येऊ लागले, पदार्थांच्या किंमती वाढल्या, यात सुधारणा झाली असे वाटत नाही जुन्या परिस्थितीतली थोड्या गरजा आणि नियमीत पुरवठा ही स्थिती त्याना बरी वाटते नवीन डोळ्याना, रोख पैसा हातात ज्यास्त खेळू लागला, राहणीचे मान वाढले, नवीन नवीन गरजा उत्पन्न झाल्या व होत आहेत, यांतच सुधारणा दिसते यापैकी कोणतेही मत खरे असो, गाव आणि रयत यांची आजच्या परिस्थितीत जी वास्तवीक दुर्दशा आहे तिकडे मात्र अजून कोणाचेच लक्ष गेलेले नाही. गाव मोडले किंवा मोडत चालले अशी आज वस्तुस्थिती आहे. याची कारणे—१ पूर्वीच्या काळी कर पिकाच्या मानाने घेत असत. त्यामुळे दरवर्षी पिकाची पाहणी, कराचा अनिश्चितपणा वगैरे प्रकारचा त्रास असला तरी पैसा कमी व सूट हवी तेव्हा मिळण्याचा संभव ज्यास्त. यामुळें रयतेला ती व्यवस्था जास्त सोईची होती. आज वसूल पैशाच्या रूपानें होतो. त्यामुळें गावात सावकार शिरला आहे.

त्याचप्रमाणे पूर्वीचे बलुतेदार नाहीसे झाल्यामुळें रस्ते, गटारें, सार्वजनीक जागा, देवळें याची गैरव्यवस्था झाली. लोकलबोर्ड असतील; पण जुने वैद्य, हकीम व पतोजी साहजीकच गेले आणि त्याच्या जागी मास्तर व 'डागदार' आले नाहीत. सरकार गावचा वसूल चोपतें, पण गावकऱ्याचे हित बघत नाही. पाटलाचे न्यायमनसुब्याचे अधिकार काढून घेतल्यामुळे गावात क्षुल्लक मारामारी झाली तरी वेळेला जिल्ह्याच्या सेशन कोर्टापर्यंत धावावें लागते, आणि यामुळे फिर्यादी आरोपी व विशेषतः साक्षीदार याचे फार नुकसान होते. गावाची स्थिती आज अशी आहे. ही सुधारावयाची असेल व गाव पुन सुस्थितीला आणावयाचे असतील तर कराची फेरतपासणी झाली पाहिजे व विशेषत कर वसूल करण्याच्या पद्धतीत फरक झाला पाहिजे, व ग्रामपचायतीचें पुनरुज्जीवन केले पाहिजे" असा एकदरीत निबधाचा आशय आहे. दादाभाई, रानडे, दत्त, गोखले या पुढील मडळीनी ग्रामसस्थाच्या दुस्थितीची मीमामा याप्रकारेच केली आहे आज चाळीस वर्षानतर सरकारलाही ती पटून पुन. गावपचायती अस्तित्वात येऊ घातल्या आहेत. या एका गोष्टीवरूनच गोपाळरावाचे या बाबतीतले विचार किती मार्मीक व मुद्देसूद होते हे दिसून येईल.

अशाच प्रकारच्या मार्मीक आणि माहितीने भरलेल्या अशा दुसऱ्या एका निबंधाचा विषय, **'हिंदुस्थानास दारिद्र्य येण्याचीं कारणें'** असा आहे. त्यावरून जर काही अनुमान काढावयाचें असेल तर तें एवढेंच की, गोपाळरावाचे मन शरीराबरोबर म्हातारें न होता नेहमीच तरूण होतें व त्याची मते परिस्थितीनुरूप शेवटपर्यंत उत्क्रांत होत होती. हे निबध १८७६ साली इदुप्रकाशांत प्रसिद्ध झाले. आयात व निर्गत व्यापाराचे त्या सुमाराचे आकडे हिंदुस्थान, इंग्लड, कानडा

वगैरे देशांचे घेतले तर असे दिसतें की, इतर देश जितका माल बाहेर पाठवितात त्यापेक्षा ज्यास्त माल विकत घेतात. कारण मजुरी, वाहतुकीचें भाडे, कमिशन, व्याज इत्यादी अनेक रूपानी त्याचे इतर देशाकडे असलेलें येणे अशा रीतीने वसूल होत असते. उलट हिंदुस्थानासारखे परावलंबी व कर्जबाजारी देश, सिव्हिल सर्वंटाची पेनशने, लष्करी खर्च, कर्जावरील व्याज वगैरे अनेक रूपानी बाहेर पाठवावयाचे पैसे निर्गत मालाच्या रूपाने पाठवीत असतात. याप्रमाणेच रेल्वेसारखी परदेशी माल पाठविण्याची साधने हवी तेवढी उपलब्ध झाल्यामुळें, यंत्रकौशल्यात युरोपीयन लोक आपल्यापेक्षा पुढे गेलेले असल्यामुळे व आमच्या ग्रामसंस्था मोडून लहान लहान उद्योगधंदे बसल्यामुळे देशातील दारिद्र्य वाढतच आहे, असे या निबंधात प्रतिपादिले आहे दादाभाई नवरोजी यांनी इंग्लंडातील एका सभेपुढे त्या वेळच्या सुमारास वाचलेल्या Poverty in India या निबंधाच्या आधारानें ही पत्रे लिहिली आहेत अर्थातच विचाराची जबाबदारी अगर श्रेय ही दोन्हीही गोपाळरावाची नव्हत पण कठीण आणि वादग्रस्त विषय स्वत. नीट समजून घेऊन सोप्या भाषेत व्यवस्थितपणे मांडणें हें कामही काही सोपे नाही

'**दयानंदस्वामींचें चरित्र**' हा 'लोकहितवादी' मासीक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेला निबंध विषयाची मांडणी व भाषा या दोन्ही दृष्टींनी बऱ्याच वरच्या दर्जाचा आहे गोपाळराव अहमदाबादेस असताना तेथें दयानंदाच्या व्याख्यानाची छाप इतराप्रमाणे यांच्यावरही पडली व तेव्हापासून आर्यसमाजाकडे त्याचें लक्ष लागले. त्याप्रमाणेच गोपाळरावांच्या निस्पृहीपणाचें व सालसपणाचें स्वामींना कौतुक वाटलें व म्हणून स्वामींनी आपलें शेवटचें मृत्युपत्र केलें तेव्हा गोपाळरावाना आर्यसमाजाचे एक ट्रस्टी नेमिलें होतें. स्वामींच्या

अलौकिक विद्वत्तेबद्दल, तर्कशक्तीबद्दल व वाक्पटुत्वाबद्दल गोपाळ-रावाना फार आदर वाटत असे व ते त्याना अद्वितीय पुरुष म्हणत. पुण्यातील टवाळ मडळींनी स्वामींची चेष्टा केल्यामुळे गोपाळ-रावाना विशेषच वाईट वाटे व त्यांतल्यात्यात निबधमालेच्या स्वयं-मन्य कर्त्यांनी टवाळाची बाजू उचलून धरली यात पुणेकरानी आपल्याच मूर्खपणाचे प्रदर्शन केले असे ते म्हणत. त्यामुळेच स्वामीवरचा हा चरित्रात्मक लेख विशेष आदरभावाने भरलेला आहे.

गुजराथ, सौराष्ट्र, लका व राजस्थान या देशाचे इतिहास व **'पृथ्वीराज चव्हाण'** त्याचप्रमाणे हिंदुस्तानचा इतिहास व महमदी धर्माची माहिती, तसेच 'वृत्तवैभव' पत्रात प्रसिद्ध झालेले पारशी, शीख वगैरे धर्मासबधी लेख व ब्रिटीश कायद्याची माहिती याचा विचार पृथक्पणाने या ठिकाणी करता येत नाही. हे सर्व लेख अनेक प्रकारची माहिती मिळवून, सुसगतपणानें व सरळ बाळबोध भाषेत लिहिलेले आहेत ऐतिहासीक गोष्टींची भाषापद्धती व या ग्रथाची भाषापद्धती यात फरक नाही.

क्वचित् प्रसगी एखाद्या विशेष मन हलवून सोडणाऱ्या, आनदाच्या अगर दुःखाच्या विशेष प्रसगाचे वर्णन करावयाचें असेल, किंवा सुदर—स्थलवर्णन करावयाचें असेल तेव्हा गोपाळरावाच्या भाषेत काव्याचा ओलावा दिसतो. उदाहरण म्हणून राजस्थानाच्या इतिहासांतील कृष्णाकुमारीची हकीकत वाचावी; किंवा लकेच्या इतिहासाच्या आरभीच्या देशवर्णनातील खालील उतारा पहावाः—

"कन्याकुमारीपासून खाली दक्षिणेकडे दृष्टी फेकिली असता हें द्वीप जलसमुद्रामध्यें असणाऱ्या मंदिराप्रमाणे सुदर, मोहक व रमणीय दिसतें. येथील जमीन लोण्यासारखी मृदु व पिकाऊ असून हिच्यावर किर्रे वृक्षाची झाडी आहे. मधून मधून उच्च उच गवत व

या झाडीतून पर्वतांची उच शिखरें आपली डोकी वर काढीत आहेत असे दिसतें. मधून मधून सूर्यकिरणें पडत आहेत आणि त्यामध्ये वनपशू आनदाने बागडत आहेत, पक्ष्याचा एकच किलकिलाट होऊन राहिला आहे असा हा एकच चित्तवेधक थाट जमून गेला आहे." वगैरे.

लोकहितवादींची सर्व पुस्तकें आज उपलब्ध नाहीत मतभेदाची वावटळ ज्याला बाधावयास नको अशी "ऐतिहासीक गोष्टी" सारखी पुस्तके देखील जितकी वाचली जावी तितकी जात नाहीत. कालातराने त्याच्या इतर पुस्तकापेक्षा हीच पुस्तके कदाचित् जास्त टिकाऊ व महत्त्वाची ठरतील. परतु लोकहितवादी या पुरुषाचे लोकहित-वादित्व या पुस्तकात नाही ते जर कशात असेल तर यातच आहे की. या देशात दोन विजोड सस्कृतीचा मिलाफ होत असताना त्यातल्या त्यात जास्त प्रगमनशील व जोराची अशी जी पाश्चात्य सस्कृती तिचे मर्म ओळखून ती आपल्या देशात रूढ व्हावी म्हणून त्यानी विचारानी व आचारानी शक्य तेवढे प्रयत्न केले. कौपर साहेबाची एकनिष्ठ सेवा करून त्यानी आपले घर भरले नाही. आपल्या पडिताचे ज्ञान कुचकामाचे व भटानी समाजव्यवस्थेत गोंधळ उड-वून दिला असे त्यांनी म्हटले असेल, व आहेही, तर ते केवळच इग्रजी सस्कृतीची स्तुती करण्याकरिताच म्हटले असे नाही त्यानी ज्ञानाची योग्यता त्याच्या उपयुक्ततेवरून मापिली असली तरीही त्यात काही वावगे नाही. कालिदासाच्या मेघदूताच्या एका प्रतीची व पसाभर पुटाण्याची योग्यता सारखी नव्हे हे कबूल. दुपारच्या बारा वाजता कदाचित् फुटाण्याची योग्यता जास्तही होईल. एकदरीत लोकहितवादींचे लेखन, त्यानी काय लिहिले आणि त्यामुळें शाहण्याच्या व मूर्खांच्या मनाला काय वाटले यावरून केवळ ठरवावयाची नाही. ज्या हेतूने प्रेरित होऊन त्यानी त

लिहिले व ज्या काळात लिहिलें तो काळ व तो हेतू यांकडेही लक्ष पुरविलें पाहिजे.

त्यांच्या वाणीत थोडासा तिखटपणा होता तो कमी असता तर त्याच्या लेखनाचा उपयोग जास्त लौकर झाला असता. परतू एकदरीत पाहता **'शतपत्रांचा इत्यर्थ'** म्हणून लिहिलेल्या शभराव्या पत्रात आपल्या लेखांचे ध्येय म्हणून जे त्यानी सागितलें आहे तोच त्याच्या सर्व लेखनाचा व चारित्र्याचा एकदर निष्कर्ष असें मला वाटते. ते पत्र बरेंच महत्त्वाचें असल्या कारणानें येथें देतों.

" मी आपले श्रम या पत्रात सपूर्ण करणार. यास्तव या पत्रशतकाविषयीं काही सुचवितो. आज दोन वर्षे मी लोकास त्याची स्थिती—रीती कशी आहे ती अगदी भीड न धरता उघड करून सुचविली. त्यात एकादे अक्षर अधिकउणे, शुद्धाशुद्ध, कोणास वाटलें तर त्यानी क्षमा करावी. माझ्या जिवाची पक्की खात्री आहे की, जो कोणी या पत्रांचे अवलोकन करील आणि विचार करून पाहील त्यास प्रत्येक शब्द खरा आहे असे वाटेल. लोकहितवादीने कोणाची मजुरी पत्करली नाही, कशाची अपेक्षा, आशा किवा इच्छा धरली नाही. कोणाचे सागण्यावरूच किवा शिकवण्यावरून कृत्रिम वर्णन केले नाही. लाभावर किवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ती व्हावी या हेतूने लिहिलें नाही. इतके श्रम जे केले ते फक्त लोकांस त्याची वास्तवीक स्थिती कशी आहे ती कळावी, त्यानी सुधारावें, त्यास इहलोकी सुखवृद्धी व्हावी, परलोकचें साधन घडावें व आपले बहुत काळापासून दृढ गृह झाले आहेत त्यापैकी काही अविचारानें व कांहीं मूर्खपणाने जडलेले आहेत, ते कमी व्हावे किवा नाहींसे व्हावें. इतक्याच हेतूनें मी यथामतीने व इच्छेनें वेतनावाचून श्रम केले आहेत व जितकें लिहिलें आहे तें अक्षरशहा खरें निवडून विचार

करून काळजीनें लिहिलें आहे. हे लिखितशतक कोणी बाळबोध अथवा मोडी छापून मुलास सारखें वाचण्यास दिलें तर बहूत फायदा होईल. यास्तव या ग्रथावर 'लोकहितवादी' आपली सत्ता ठेवीत नाहीत. पाहिजे त्यांनी ही छापून प्रगट करावी कितीएक प्राचीन काळचे लोकास लोकहितवादींची कितीएक मते विपरीत आहेत याविषयीं विचार केला तर खात्री होईल यापुढें काही दिवसानी लोकहितवादी दुसऱ्या शतकास आरभ करील, परतु ही गोष्ट ईश्वराचे स्वाधीन आहे. मला वारवार लोकास इतकेच सुचवावयाचे की, मी काही व्यर्थ, मिथ्या किवा असत्य लिहिले नाही. जे लिहिले ते यथार्थ आहे, असे मला तर खचीत वाटते. जे सारासार विचार करणारे, ज्याची मतें पडितासारखी कुत्सित नसून विस्तीर्ण झाली आहेत, त्यास हे समजेल माझी सर्व जगास एवढीच विनती आहे की, तुम्ही सर्वजण विचार करण्यास लागा, वाचावयास लागा, नवीन ग्रथ व वर्तमानपत्रें वाचा. तुमचे शेजारी काय होत आहे याचा विचार करा इग्रजामध्ये किती एक चागले गूण आहेत ते तुम्हास प्राप्त व्हावे म्हणून ईश्वरानें ही तुमची त्याची सगत घातली आहे हे लक्षात आणा सारासार पहा परपरा,आधळ्याची माळ लागली म्हणून तीच चालवू नका धर्मशील ईश्वरतत्पर, व्हा, या गुणावाचून सर्व व्यर्थ आहे, सत्य बोला दुष्ट वासना सोडा, धर्म सुधारणा करा, म्हणजे जुने टाकू नका, परतू त्याचा अर्थ घ्यावयाचा तो काळ पाहून घ्या व ईश्वरसबधी जगासबधीं ज्ञान सर्व लोकात वृद्धिगत करा आळस सोडा तुमच्यामध्यें वास्तवीक बुद्धीमान असेल त्यास पुढारी करा, त्याचे अनुमतीनें चाला, सर्व लोकाची जूट असूद्या. आपसात फूट नसावी हें ध्यानात वागवा. विद्या अधीक होऊन तुमचें पाऊल पुढें पडू द्या. सर्व देशाची काळजी प्रत्येकजणानी करावी

चाललें आहे व राजा कोण, त्याची वर्तणूक कशी, हें पाहात जा. माहीतगार व्हा. तुमच्या प्राचीन काळच्या विद्या, ग्रंथ, तर्क व कल्पना याचे शभरपट व हजारपट आता चांगल्या विद्या व कल्पना निघालेल्या आहेत त्या सर्व पहा. तुमचे संपत्तीवर तुम्ही लक्ष देऊन आळसात राहू नका भट व पंडित हे केवळ मूर्ख, हे पक्के समजा. खरी नीती कोणती ते पहा. पैसा खाऊ नका, रांडबाजी करू नका प्रपंच, संसार, भलाईने करा, आपले शत्रूस देखील वाईट इच्छू नका शरीराने व मनाने देखील पाप करू नका. प्राणीमात्रावर दया करा. अपराध क्षमा होतील तितके करा, परंतू क्षमा न करण्याचा प्रसंग येईल तेथे क्षमा करू नका एकमेकावर प्रीती करा. नित्य उठून ईश्वराचे भजन व प्रातःकाळी चिंतन करीत जा व त्याजवळ क्षमा मागा आपले हातून पापे व अपराध बहुत घडतात त्याची क्षमा भगवंताशिवाय करणार समर्थ कोणी नाही ढोंग, सोंग करू नका. लबाडी सर्वदा ईश्वरास दिसते यास्तव ती कदापी करू नका. कोणतेही पाप करू नये, ते फार वाईट इहलोकी क्षणभर सूख वाटेल परंतु त्याचा झाडा द्यावा लागेल. मरावयाचे आहे हे नित्य मनात आणा. तुम्ही आपले मुलाची काळजी करून त्यास शहाणी करा व सर्व लोकांची काळजी करा नित्य काही तरी सर्व देशाचे कल्याण केल्याशिवाय एक दिवस जाऊ देऊ नका मुख्य ईश्वरभजन करण्याचा मार्गच आहे की कोणास दुःख देऊ नये व सर्व लोकाचे हित करावे स्वदेशाचे हित इच्छावे. म्हणजे परदेशाची हानी इच्छावी असे नाही परंतू सांप्रत आपले लोक फार वाईट अवस्थेत आहेत; सबब फार खबरदारी ठेवावी की, या लोकांचे कल्याण कसें होईल. तुम्ही आपल्यास योग्य करा, अब्रू वाढवा, पैका मिळाला तर अब्रू वाढते. असें नाही. अब्रू खरेपणा व निर्मळपणा यापासून उत्पन्न होते.

विद्या केली तर त्याप्रमाणे वागणूक पाहिजे. नाही तर विद्या व्यर्थ आहे. विद्येचें सार्थक रोजगार नव्हे ज्यास विद्येचा अर्थ ठाऊक नाही, ते असे म्हणतात. परंतु फक्त पोटच भरणारी ती विद्या नव्हे ती मजुरी आहे विद्या म्हणजे ज्ञान जेणेंकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो, समर्थ होतो उनाड जे लोक आहेत ते विद्येचें तात्पर्य द्रव्य मिळविण्याचें असे समजतात. परंतु विद्येपासून द्रव्य-लाभही होतो व दुसरे अनेक लाभ होतात. याप्रमाणें तात्पर्य मी निरूपण केले याप्रमाणे सर्वांनी चालावे आणि असें होण्यास माझे श्रम काही उपयोगी पडले असे दृष्टोत्पत्तीस आल्यास माझे श्रम परिहार होतील माझे मागणे सर्व लोकास आहे की, मी जें लिहिले आहे त्याचा विचार करून पहा. तुमच्या चांगल्या वाचून त्या लिहिण्याचा हेतु नाही. तुमचे कल्याण व्हावे म्हणून मी झटतो व तुमच्या चुक्या वगैरे मी उघड करून दाखविण्यात तुम्हास रागरोष येईल हें मी मनात आणले नाही कारण की, माझी उत्कंठा तुमच्या सुधारण्याकडे फार आहे. माझे अंतःकरण सर्व तिकडे आहे यास्तव मी जे लिहिलें आहे त्याचा तुम्ही विचार करावा कारण की, ज्याने तुमची सेवा एक निष्ठेने व निष्कपटपणाने केली त्याजवर तुमची इतराजी नसावी किंबहुना तो काय बोलतो हे तरी मनन करावें. अस्तु. तुमची आमची गाठ आज दोन वर्षे सतत होती. याचा मोठा आनंद सर्वकाळ वाटेल सर्वांनी कृपा लोभ असो द्यावा हे विनती."

—**लोकहितवादी.**